हरि नारायण आपटे हे मराठीतील पहिले श्रेष्ठ कादंबरीकार. त्यांनी लिहिलेल्या कादंबऱ्यांनी मराठीत एक युग निर्माण केले. मी, पण लक्षात कोण घेतो इत्यादी सामाजिक कादंबऱ्या व उषःकाल, गड आला पण सिंह गेला इ. ऐतिहासिक कादंबऱ्या त्यांच्या प्रसिद्ध आहेत.



मूल्य : 14 रुपये

नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया

हरि नारायण आपटे हे मराठीतील पहिले श्रेष्ठ कादंबरीकार. त्यांनी लिहिलेल्या कादंबऱ्यांनी मराठीत एक युग निर्माण केले. मी, पण लक्षात कोण घेतो इत्यादी सामाजिक कांदबऱ्या व उषःकाल, गड आला पण सिंह गेला इ. ऐतिहासिक कादंबऱ्या त्यांच्या प्रसिद्ध आहेत.



मूल्य : 14 रुपये

नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया

राष्ट्रीय चरित्र माला

# हरि नारायण आपटे

म. अ. करंदीकर

अनुवाद
गं. ब. ग्रामोपाध्ये





नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया

# अनुक्रमणिका

# जन्म आणि बालपण

आपटे कुटुंब हे कोकणात स्थायिक झालेल्या चित्पावन कुटुंबांपैकी एक कुटुंब. हरीभाऊ आपट्यांचे आजोबा हे खानदेशात महालकरी होते. त्यांना दोन मुली आणि चार मुलगे एवढी अपत्ये होती. नारायण हा चार मुलांपैकी एक होता, आणि हा नारायण म्हणजेच हरीभाऊ आपटे यांचे वडील. त्या काळच्या राहणीमानाप्रमाणे आपटे कुटुंब खाऊन पिऊन सुखी होते. नारायणरावांचे लग्न खानदेश जिल्ह्याचे मामलेदार श्री. गणपतराव परांजपे यांच्या यमू नावाच्या मुलाशी झाले होते. नारायण आणि त्याचा भाऊ महादेव यांना खेडेगावात पुढील शिक्षण देणे शक्य नव्हते आणि त्यांचा तर त्याबाबत आग्रह होता. म्हणून त्यांच्या आईने त्यांना पुढील शिक्षणासाठी पुण्याला पाठवले आणि ते सरकारी हायस्कुलात दाखल झाले. नारायणला आढळले की मिळणाऱ्या तुटपुंज्या पैशात दोघांच्या शिक्षणाची चैन परवडणारी नाही आणि म्हणून त्याने शाळा सोडून इंदूरला दरमहा दहा रुपये पगाराची नोकरी पत्करली. पुढे बरेच दिवसानंतर त्याने इंदूर सोडले तेव्हा त्याचा पगार तीस रुपये होता. पुण्यात शिकणारा भाऊ महादेव हुशार होता आणि म्हणून नारायण त्याला पैसे पाठवीत असे.

इंदूरला असताना नारायणाची पत्नी लक्ष्मी प्रसूत होऊन ८ मार्च १८६४ रोजी (पंचांगाप्रमाणे शके १७८५ मधील माघ अमावस्या) तिला 'मुलगा झाला. गंगूताईसाठी म्हणजे आजीसाठी तर ही एक महान घटना होती. १८६४ साली आपटे कुटुंब पुण्याला आले. १८६७ साली नारायणरावांनीही इंदूरची नोकरी सोडून मुंबईला भारतीय टपालखात्यात नोकरी धरली. थोरले बंधू महादेवरावही १८६७ साली बी.ए. परीक्षा पहिल्या क्रमांकाने उत्तीर्ण झाले आणि सर्वच कुटुंब एकत्र राहाण्यासाठी मुंबईला गेले. १८६८ साली हरीची आई तिसऱ्या मुलाच्या जन्मानंतर बाळंतरोगाने वारली, पाठोपाठ ते मूलही गेले. त्याआधीची मुलगी ही गाडीतच बहुधा न्युमोनियाने वारली होती. हरीने आईचा मृत्यू पाहिला होता आणि त्यावेळी जरी तो चारच वर्षाचा होता तरी त्याचा परिणाम त्याच्या मनावर दीर्घकाळपर्यंत टिकला. तिचे

मरणकाळचे शब्द " पण लक्षात कोण घेतो ?" या कादंबरीत अमर झाले आहेत. ती मृत्यूशय्येवर असताना हरीला वाटेल ते करून मी वाढवीन, असे वचन महादेवाने तिला दिले होते. आणि ते त्याने कटाक्षाने पाळले. हरीचे आपल्या आईवर अतिशय प्रेम होते, आणि ते त्याने "पण लक्षात कोण घेतो ?" मधील यमूच्या आईच्या, "मी" कादंबरीतील सुंदरीच्या आईच्या, आणि "कर्मयोग" मधील चंद्रशेखरच्या आईच्या स्वभावचित्रात सुंदरपणे रेखाटले आहे.

हरीला आता आजीच्या आणि काकूच्या मायेची ऊब अधिकाधिक मिळू लागली. तो स्वभावाने खोडकर होता आणि एकदातर पोलीस कमिशनरच्या हुकुमाला डावलून मुंबईच्या रस्त्यावर फटाके वाजवण्याच्या गुन्ह्याबद्दल झालेल्या पोलिसांच्या रागापासून त्याला त्याच्या चुलत्याला वाचवावे लागले. भाजी विकणारे, गारुडी आणि इतर तत्सम व्यक्ती यांच्या नकला करण्यात त्याचा कोणी हात धरू शकत नसे. हरीच्या वडिलांनी १८७० साली दुसरे लग्न केले. त्याची सावत्र आई प्रेमळ होती. पण नानासाहेबांच्या वरचेवर होणाऱ्या बदल्यामुळे त्यांचे एकत्र राहाण्याचे प्रसंग फारच थोडे येत. हरी प्रथम काही दिवस मुंबईस आपल्या चुलत्यांकडे राहात होता आणि मग तो त्यांच्या पुण्याच्या घरी आपली आजी आणि विधवा चुलत आजी यांच्या छत्राखाली राहू लागला.

१८७१ साली अण्णासाहेबांनी कायद्याची पदवी मिळवली आणि तिच्यातही पुनः ते पहिले आले. सर्वांनाच त्यांच्या या यशाबद्दल आनंद झाला. काही दिवस अण्णासाहेबांनी मुंबई सरकारच्या न्यायखात्यात सब-जज म्हणून काम केले. पण त्या जागेचा राजीनामा देऊन मुंबईच्या उच्च न्यायालयांत त्यांनी वकिली सुरू केली. मध्यंतरी १८७२ साली त्यांची पत्नी क्षयाने वारली आणि हरी पुनः एकदा पोरका झाला. वकिलीत अण्णासाहेबांनी चांगला पैसा मिळवला. पण पत्नीच्या मृत्युने ते मनातून खिन्न झाले आणि एकत्र कुटुंबाला आर्थिक मदत करण्याबाबतची त्यांची आस्था लवकरच कमी झाली. घरातीलही त्यांचे वागणे सहन करणे कठीण जाई. एकदा ते आपल्या विधवा बहिणीला कडक शब्दांनी बोलले, तेव्हा आता आपण वेगळे बिऱ्हाड करावे हे हरीच्या वडिलांना इष्ट वाटले. लगेच दुसऱ्याच दिवशी मुंबईतच फणसवाडीत त्यांनी जागा पाहून बिऱ्हाड केले. पण मुंबईचा वाढता खर्च त्यांना झेपेनासा झाला, तेव्हा १८७८ साली त्यांना आपले कुटुंब पुण्यास हलवावे लागले; कारण मुंबईच्या मानाने पुण्याची राहणी स्वस्ताईची होती.

हरीची मुंज त्याच्या चुलतीच्या आग्रहाखातर तिच्या मृत्युच्या आधी १८७२ साली केली गेली. मुंजीचा समारंभ थाटाने झाला आणि तो चांगला चार दिवस चालला. मातृभोजनाच्या वेळी शेजारी राहणाऱ्या सौ. राधाबाई गोखल्यांना चुणचुणीत हरी एवढा आवडला की आपली

लेक मथू त्यालाच लग्नाच्यावेळी देण्याचे त्यांनी जाहीर केले. राधाबाईंचे यजमान दामोदर विश्वनाथ गोखले पुण्याला वकिली करीत होते आणि ते आपट्यांच्याच शेजारी रहात होते. हरी आता पुण्याच्या शाळेत जाऊ लागला होता.

हरीची शाळेची सुरूवात मुंबईला चुलत्याजवळ असतांनाच झाली होती. त्याला वाचनाची आवड फार लौकर लागली, कारण त्याच्या चुलत्याकडे पुस्तकेही भरपूर होती. इतर मुलांच्या प्रमाणे त्याचे लक्ष खेळात नसे आणि वाचनाच्या गोडीमुळे चेष्टामस्करी किंवा मुलांच्या खोड्या यांत त्याला रस नव्हता. मुंबईच्या बिशप हायस्कूलमधून तो इंग्रजी तिसरी उत्तीर्ण झाला, पण १७७८ साली आपटे कुटुंब पुण्याला आले आणि तो पुण्याच्या सरकारी हायस्कुलात् जाऊ लागला. ही शाळा तिच्यातील तज्ञ शिक्षकांच्यामुळे प्रख्यात झाली होती. तेथील शिस्त तर चांगली होतीच पण एकूण वातावरणही उत्तम होते. मुंबईच्या ख्रिस्ती शाळेतील वातावरण वेगळे आणि काहीसे मिशनरी पद्धतीचे होते, तर पुण्याचे हायस्कूल पूर्णपणे मराठी वळणाचे आणि परंपरेचे होते. जिनसीवाले किंवा चिपळूणकर यांसारखे शिक्षक किंवा कुंटे यांच्यासारखे मुख्याध्यापक विद्वान राष्ट्रीय बाण्याचे आणि ध्येयवादी होते. त्यांच्यातील विद्वत्ता, साक्षेप, शिष्टाचार आणि अभिरुची यांचा आदर्श विद्यार्थ्यांना आढळे. तथापी हरीवर सर्वांत अधिक प्रभाव पडला तो महाराष्ट्रात शिक्षणाचे आणि विद्वत्तेचे नवे युग निर्माण करणाऱ्या चिपळूणकरांचाच. त्यांची पत्रकारिता राष्ट्रवादाच्या ध्येयांवर आधारलेली होती. १९ व्या शतकातील कावेबाज ब्रिटिश प्रचार आणि बौद्धिक विनाश यांना त्यांनी चोख उत्तर दिले होते. हरीचे शाळेतील मित्र होते ते नारायण सखाराम पानसे, कृष्णा वागळे, नरहरी जेजुरीकर, शिवराम साठे, आत्माराम देशमुख, गंगाधर महाजनी, वैजनाथ काशिनाथ राजवाडे, अत्रे, ढेकणे, परांजपे आणि लेले हे त्यांचपैकी. अनेकांनी महाराष्ट्राच्या सार्वजनिक जीवनात विविध क्षेत्रात नाव घेण्याजोगा भाग घेतला.

१८८० साली हरीच्या वडिलांची साताऱ्याला बदली झाली. तेव्हापासून पुण्याच्या घरात अनेक वर्षे हरीच सर्वात मोठा राहिला. त्या काळात त्याचे जीवन अनिर्बंध होते कारण त्या काळी स्त्रिया प्रतिबंध करून करून करणार तो किती ? त्यात पुनः तो अधिकच लाडावलेला होता. त्याच्या बालिश खोड्या अद्याप कमी झालेल्या नव्हत्या. संस्कृत शिकवणाऱ्या शास्त्रींच्या टकलावरून एकदा तरी हात फिरवल्याशिवाय तो त्यांच्याजवळ अभ्यासाला बसत नसे. मात्र रघुवंश, शाकुंतल, विक्रमोर्वशीयम आणि अभिजात संस्कृत साहित्य त्याने वाचले होते आणि स्वतः संस्कृत अभिजात साहित्य वाचण्याइतकी त्याने प्रगतीही केली होती. त्यामुळे संस्कृत आणि मराठी या दोन्ही भाषांत त्याला गती आली होती. इंग्रजीचा त्याने बऱ्यापैकी अभ्यास केला होता. पण गणिताकडे त्याने पूर्ण दुर्लक्ष केले होते. आपल्या हस्ताक्षराकडेही त्याने नीट

लक्ष दिले नव्हते म्हणून तो वर्गात कधीही पहिला आला नाही. बहुशः यांचाच परिणाम त्याच्या महत्त्वाकांक्षेचा अंत होण्यात झाला असावा. तथापि त्यांना कलात्मक दृष्टी होती. लहानपणापासूनच त्यांनी कविता आणि कथा लिहिण्यास सुरुवात केली होती. " पुरी हौस फिटली " ही त्यांची पहिली गोष्ट. इंग्रजी पाचवीत असतांनाच त्यांनी ती लिहिली होती. ते "नाटयकथार्णव" नावाचे मासिक नियमितपणे वाचीत आणि त्याचा त्यांच्या कल्पनाशक्तीच्या वाढीला उपयोग झाला.त्यांनी पेडोज टेलरच्या पांडुरंग हरी याचे "अनाथ पांडुरंग " या नावाने भाषांतर केले. "तारा" हे त्यांचे दुसरे भाषांतरित पुस्तक. पण आज ती दोन्ही उपलब्ध नाहीत. १ जानेवारी १८८० रोजी विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनी न्यु इंग्लीश स्कूलची स्थापना केली. टिळक, करंदीकर आणि भागवत हे डेक्कन कॉलेजचे पदवीधर त्यांना मिळाले. नव्या पिढीला राष्ट्रीय शिक्षण द्यावे या प्रेरणेतून या शाळेची स्थापना झाली होती. जो आत्मविश्वास राष्ट्राच्या तरुणांना स्फूर्ती देत असतो त्याच्या शिक्षणाची तर सरकारी शाळेत वानवाच होती. सरकारी हायस्कुलातील वरच्या वर्गाच्या अनेक विद्यार्थ्यांना विष्णुशास्त्री आणि अनुकरणीय व स्फूर्तिदायक शिकवण यांची माहिती होती. साहजिकच हरीने आपल्या काही सहाध्यायांच्यासह या नवीन शाळेत नाव घातले. त्यांच्या पाठोपाठ खालच्या वर्गातील तरुण मुलेही या शाळेत दाखल झाली. पहिल्याच दिवशीची शाळेच्या पटावरील विद्यार्थ्यांची संख्या १५० होती. माधवराव नामजोशी, वासुदेवशास्त्री खरे ( नंतर मराठयांच्या इतिहासाचे संशोधक म्हणून प्रख्यात झालेले ) हरी कृष्ण दामले ( इंग्रजी विषयाचे निष्णात शिक्षक ), नंदरगीकर शास्त्री (प्रख्यात संस्कृत विद्वान आणि संपादक ) ही मंडळी शाळेच्या पहिल्या दिवसापासून शाळेत शिक्षक म्हणून रुजू झाली होती. त्यांचे वेतन म्हणाल तर अत्यल्प होते.त्याच वर्षाच्या ऑगस्ट महिन्यात संस्कृतचे तज्ज्ञ वामन शिवराम आपटे हे त्यांना मिळाले. या रीतीने शाळेची सुरूवात चांगली झाली आणि नंतर अनेक वर्षे पर्यंत ती राष्ट्रीय शिक्षणाचे केंद्र बनली. तीन महिन्यांच्या काळात शाळेच्या पटावरील संख्या तीनशेपर्यंत पोहोचली होती. याच वेळी हरीने सरकारी नोकरी न करण्याची प्रतिज्ञा केली. शाळेचे सारे वातावरणच स्वातंत्र्य आणि शिक्षण यांनी भारून गेले होते. हरी जेव्हा मॅट्रीकच्या वर्गात गेला तेव्हा तो मिल्टन, स्कॉट, शेले, काट्स, जेन ऑस्टिन, डिकन्स, थॅकरे, यांचे ग्रंथ तसेच मोलियरच्या नाटकांची इंग्रजी भाषांतरे वाचू शकत होता.

न्यु इंग्लिश स्कूलचे संस्थापक विष्णुशास्त्री, दुर्दैवाने, १७ मार्च १८८२रोजी वारले. हरीला हे कळले आणि या थोर विद्वान आणि राष्ट्रीय पुरुषाच्या मृत्यूने त्याचे मन भरून आले. तो त्यांच्या प्रेतयात्रेला गेला, आणि त्याने जे पाहिले त्याने त्याचे मन प्रक्षुब्ध झाले. त्याच मनःस्थितीत त्याने त्यांच्यावर "शिष्यजन विलाप " या नावाची एक विलापिका लिहिली. ही

त्यांची कविता छापली गेली आणि तिच्या हजारो प्रती दोन दिवसात खपल्या. या राष्ट्रपुरूषाच्या शोकसभेत ती वाचलीही गेली. परिणामतः, महिनाभरात तिची सारी आवृत्ती विकली गेली आणि या छोटयाश्या कवितेने हरी प्रसिद्ध झाला. शाळेवर आणखीही एक आपत्ती कोसळली आणि केसरी व मराठा या पत्रांचे संपादक अनुक्रमे आगरकर आणि टिळक यांना कोल्हापूरचे दिवाण बर्वे यांनी लावलेल्या दाव्याच्या निकालानुसार १७ जुलै १८८२ रोजी चार महिन्यांची सक्त मजुरीची शिक्षा झाली. या दोन राष्ट्रीय पुढऱ्यांच्या कायदेशीर बचावासाठी हरीने आपल्या मित्रमंडळीसह मोठे प्रयत्न केले आणि अन्यायाविरुद्ध झगडणाऱ्या या दोन थोरपुरुषांसंबंधीचा आपला भक्तिभाव प्रकट केला. या साऱ्याचा परिणाम अभ्यासाकडे दुर्लक्ष होण्यात झाला आणि हरीला मॅट्रिकच्या परीक्षेस बसता आले नाही. पुढच्या वर्षी मात्र तो ती परीक्षा उत्तीर्ण झाला.

शाळेत असतांना हरीने जेव्हा आगरकरांनी शेक्सपिअर, कालिदास आणि भवभूती यांचे केलेले तौलनिक परीक्षण वाचले तेव्हा त्यानेही एक लेख लिहिला. आगरकरांनी आपल्या तुलनात्मक लेखात कालिदासाला शेवटचा क्रमांक दिला होता, पण हरीने आपल्या उत्तरात्मक लेखात कालिदासाच्या साध्या, प्रासादिक शैलीची भवभूतीच्या दीर्घ शब्दावडंबरी शैलीशी तुलना करून कालिदासाचे कारुण्यपूर्ण व्यक्तिचित्रण तितकेच प्रत्ययकारी असल्याचे दाखविले. तसेच कालिदासाची प्रेमाच्या चित्रणाची पद्धती भवभूतीच्या पद्धतीहून अधिक काव्यात्म असल्याचे आपले मत मूळ ग्रंथातील उदाहरणे आणि अन्य तत्सम मते यांच्या आधारे सिद्ध केली.

याच सुमारास हरीने लॉग फेलोच्या " साय ऑफ लाईफ " चे भाषांतर केले. या त्याच्या भाषांतराला नंतरच्या काळी शालेय पाठ्यपुस्तकात स्थान मिळाले. आता तो मूळ संस्कृतचेही चांगले भाषांतर करू शकत होता.

वर्षभराने त्यांनी आणखी एक प्रख्यात लेख लिहिला तो आगरकरांच्या विकारविलसिताचे (शेक्सपिअरच्या हॅम्लेट च्या भाषांतराचे ) गुणदोषात्मक विवेचन करणारा, १८८२ चा हा लेख छापील ७२ पानांचा होता. आगरकरांनीही मोकळ्या मनाने हरीच्या टीकेचे स्वागत केले. कारण तो लेख त्यांच्या विद्यार्थ्याचा होता आणि त्याबद्दल त्यांना याचा अभिमानच वाटला. हरीची आजी आपल्या थोरल्या मुलीच्या मनुताईच्या वैधव्याने आणि अण्णासाहेबांच्या (हरीच्या चुलत्याच्या ) छंदिष्ट वर्तनाने मोठी कष्टी होती. ती आपला बहुतेक वेळ पुजा-अर्चा आणि जपजाप्य यांतच घालवित असे. हरी हा तिचा सर्वात अधिक लाडका नातू होता. ती त्याच्यासाठी गोडधोड पदार्थांचे घास दोन घास तरी राखून ठेवीत असे. हरीचेही आपल्या आजीवर फार प्रेम होते आणि रोज तिच्याशी बोलण्याचे आणि तिने सांगितलेल्या गोष्टी ऐकण्याचे तो चुकत

नसे. आता त्याची चुलत आजी आपटयांचे घर मोठया काटकसरीने चालवीत होती. किंबहुना साऱ्या घरात तिचा अंमल होता म्हणांना.

हरी आता सोळावे वर्ष पूर्ण करण्याच्या बेतात होता आणि त्या काळच्या पद्धतीनुसार लग्नाला योग्य झाला होता. त्याचे शेजारी श्री. दामोदरपंत गोखले यांच्या मुलीशी मथूशी त्याचा वाङनिश्चय तर झालेला होता आणि आता लग्नाची तारीखही ठरली,१६ मे १८७९ ही ती तारीख होय.

हरीच्या आजीच्या सक्त आज्ञेमुळे ,त्या वेळच्या प्रथेच्या विरूद्ध,हुंडा घेतला गेला नव्हता. गोखले कुटुंबाने साऱ्या नातेवाईकांचा भरपूर मानपान करून लग्नसमारंभ मोठया थाटामाटात पार पाडला. यापुढे हरीला सर्वजण 'तात्या' म्हणून संबोधू लागले.

नव्या घरी,म्हणजे सासरी नववधूची म्हणजेच मथूची फार प्रशंसा होई. लहान मुलगी म्हणून ती आपल्या आई-वडिलांचीही लाडकी होती. ती संध्याकाळी त्यांच्या घरी जाई आणि दुसरे दिवशी सकाळी परते. थोडेफार अपवाद वगळता,हे चक्र पाच वर्षापर्यंत चालले. या पाच वर्षोत दोन्ही घरचे सणवार उत्साहाने साजरे झाले. मथूला अशा घरकामाची सवय नव्हती आणि म्हणून ते शिकण्यास तिला वेळ लागल्याने घरातील अन्य सुनांच्या तुलनेत ती मागे पडे. पण सामान्यपणे या तिच्या उणेपणाकडे दुर्लक्ष केले जाई.

आता आपल्याला हरीच्या विचाराचा परिचय होणे शक्य आहे. आपल्या बायकोला लिहा-वाचायला आणि थोडी आकडेमोड करायला यावे असे त्याला वाटत होते. पण ती तर पूर्ण निरक्षर होती. जर भारताची सांस्कृतिक प्रगती व्हावयाची असेल तर स्त्रियांना निरक्षर ठेवणे योग्य नव्हे याची त्याला जाणीव झाली होती. चालू शिक्षणपद्धती सुरू होण्याआधी भारतीय स्त्रिया पूर्णपणे अशिक्षित नव्हत्या. फक्त शिक्षणाचे मार्ग आणि त्याचे ध्येयही निराळे होते. त्यांना आपल्या कर्तव्याची जाण असे. त्या उत्तम गृहिणी होत्या,तसेच बोलण्याचालण्यात सभ्य आणि चतुर होत्या आणि उच्च प्रकारच्या सुसंस्कृतही होत्या. भले त्यांना आधुनिक विज्ञान इतिहास आणि भूगोल यांची माहिती नसेल. हे सिद्ध करण्यासाठी इतिहासातील उदाहरणे देण्याची गरज नाही. मिलच्या "सबजेक्शन ऑफ वूमेन " यासारख्या पुस्तकांच्या वाचनाने आपल्या स्त्रियांना आधुनिक अर्थाने सुशिक्षित करावे, त्यांना त्यांच्या कर्तव्याची आणि जबाबदारीची जाणीव द्यावी या बाबत सुशिक्षित तरूणांच्या इच्छेला धार आली होती. मिलच्या विचारांचे हरीला फार मोठे आकर्षण होते. त्यांच्या समोर त्यांच्या कॉलेजमधील एका वर्गमित्राच्या बायकोचे सौ. काशीबाई कानिटकर यांचे उदाहरण होते. घरातील सनातनी स्त्रियांच्या विरोधाला न जुमानता पण घरातील कामकाजाची कर्तव्य पार पाडून त्या आपल्या पतीच्या

मदतीने इंग्रजी आणि मराठी शिकल्या. हरीला त्यांच्या या महान कार्यसिध्दीबद्दल मोठा अभिमान होता. आपल्या बायकोनेही हे उदाहरण गिरवावे असे त्यांना वाटे आणि म्हणून त्यांनी तिला शिकवावयाला सुरवात केली. तथापि ती मात्र त्या बाबत फारशी उत्साही नव्हती. घरातील इतर स्त्रियांची वृत्तीही सनातनी होती. इंग्रजी शिक्षण, नव्हे सारेच शिक्षण त्यांना अनावश्यक तर वाटेच, पण पुनः ते अनाचाराकडे नेणारे वाटे. घरकाम करता येणे आणि मुलांना वाढविण्याची पात्रता येणे हे पुस्तकी शिक्षणाहून अधिक महत्त्वाचे आहे अशी त्यांची एकूण वृत्ती होती. हरीच्या पत्नीची स्थिती इकडे आड तिकडे विहीर अशी झाली. घरात ज्या बायकामाणसांच्या सहवासात राहावयाचे त्यांनाही खूष करायचे आणि पुनः नवऱ्याच्या उत्साही इच्छेलाही मान द्यायचा. हरी तिला शनिवारी - रविवारी शिकवायचा. कारण त्या दोन्ही दिवशी तो कॉलेजच्या वसतिगृहात न राहता घरी राही. पण त्याचे शिकवण्याचे सारे प्रयत्न निष्फळ होत, कारण मधल्या काळात शिकवलेले धडे वाचावयाला वा त्यांची उजळणी करावयाला तिला संधीच मिळत नसे. हरीने तिची सौ. काशीबाई कानिटकरांशी ओळख करून दिली आणि त्यांची भेट जितक्या अधिक वेळा घेता येईल तितक्या अधिक वेळा घेण्यास सांगितले. पण तेही तिला शक्य झाले नाही, कारण घरातील वडीलधाऱ्या स्त्रियांना नाखुष न करता घरच्या सनातनी शिस्तीतून वेळ काढणे तिला कठीण जाई. या साऱ्याचा परिणाम नवीन लग्न झालेल्या मुलीच्या मनात, असमाधान, असंतुष्टता आणि गोंधळ यांची गर्दी होण्यात झाला. हरीच्या मनाचाही गोंधळ झाला, पण एकूण परिस्थितीत सुधारणा करणे त्याला शक्य झाले.

१८८३ साली हरीने न्यू इंग्लिश स्कूल सोडले आणि डेक्कन कॉलेजात प्रवेश घेतला. डेक्कन कॉलेज हे विद्येचे प्रख्यात पीठ होते. भव्य इमारत , निष्णात इंग्लिश प्राध्यापक, उत्तम ग्रंथालय , मोकळ्या क्रीडांगणासह उत्कृष्ट वसतिगृह आणि पोहण्याची आणि होडी वल्हवण्याची सोय यामुळे अभिमान वाटण्याजोगे ते कॉलेज होते. तेथे हरीने अभ्यासक्रमात नेमलेल्या पुस्तकांच्यापेक्षा अधिक पुस्तकांचे भरपूर वाचन केले. जे.एस्.मिल आणि हर्बर्ट स्पेन्सर यांच्या पुस्तकांनी तो खूप आकर्षिला गेला. अन्य जे ग्रंथकार त्याने वाचले त्यांत बेकन, बर्क, स्कॉट, जॉन्सन मेकॉले आणि जेन ऑस्टिन यांचा समावेश होतो. जवळ जवळ १९२० पर्यंत रेनॉल्डस् नावाचा लेखक (जो इंग्रजी वाङमयाच्या इतिहासकारांनाही माहीत नव्हता ) महाराष्ट्रातच नव्हे तर सर्व हिंदुस्थानभर फार लोकप्रिय होता. त्याचे "मिस्टरीज ऑफ दि कोर्ट ऑफ लंडन ," " सोलजर्स वाईफ " आणि इतर कादंबऱ्या व्यापक प्रमाणात वाचल्या जात. हरीने रेनॉल्डसची पुस्तकेही वाचली. त्याने शेकस्पिअरचेही वाचन केले आणि कॉलेजच्या पहिल्याच वर्षी "निबंधचंद्रिका" या मासिकात "रोमीयो एन्ड ज्युलिएट " यावर एक लेख

लिहिला.राजकारण,धर्म आणि तत्वज्ञान या विषयांवरील पुस्तकेही तो आवडीने चाळी.त्याला "हिस्टरी ऑफ ब्रिटिश कॉन्स्टिट्यूशन" हे हॅलॅमचे पुस्तकही आवडले. कॉलेजचा अध्यापकवर्ग म्हणजे विद्वानांचा एक समुहच होता.त्यात ऑकझेनहॅम,सेल्बी,फॉरेस्ट,आर.जी. बॅरेट, तसेच एस्.आर.भांडारकर, वामनाचार्य झळकीकर शास्त्री आणि इतरही अनेकांचा समावेश होता. व्ही.के.राजवाडे ( जे नंतर इंग्रजीचे प्राध्यापक झाले ) हे तेव्हा कॉलेजचे दक्षिणा फेलो होते.या पूर्वी या देशातील विद्यार्थ्यांना माहीतही नसणारे स्वातंत्र्य या कॉलेजच्या विद्यार्थी जीवनात होते. विद्यार्थी घरापासून दूर असत, पालकांचा व धर्माचा निर्बंध नसे, तसेच ते हवेते वाचायला वा करायला मोकळे होते आणि बरोबरीच्या मुलांत मनाप्रमाणे मिसळावयाला, गप्पाटप्पा करावयाला आणि खेळायलाही ते मोकळे होते. (याचा फायदा काही मुले सोडली तर इतरांवर चांगला होई.) त्यांच्यातील चांगले गुण वाढीला लागत. हरी या मुक्त जीवनात मनापासून रमला. तो कॉलेजच्या वक्तृत्वात भाग घेई, पण त्याचा प्रमुख उद्योग असे तो ग्रंथालयात बसून वाचण्याचा.तेथे खास विद्यार्थ्यांचे ग्रंथालय होते पण त्या वेळा त्यात मराठी पुस्तके नव्हती. ती केवळ हरीच्याच प्रयत्नाने आणि अर्जविनंतीने या ग्रंथालयात येऊ लागली. याच कॉलेजात त्याला अनेक मित्र लाभले. तो कोटीयुक्त बोले म्हणून त्याच्या भोवती मित्रमंडळी जमत. गोल्डस्मिथच्या "शी स्टूप्स टु कॉंकर" या नाटकात त्याने टोनी लुम्किन चे काम केले तर समर्थ आणि पानसे यांनी अन्य पात्रांची कामे केली. भारतीय खेळात त्याला विशेष रस नसला तरी तो टेनिस चांगला खेळे आणि होडी वल्हवणे जरी त्याने कधी केले नाही तरी होडयातून सफर करण्यात तो रमे. वर्षाच्या अखेरीस तो प्रिलिमिनरी परिक्षेस बसला पण गणितात नापास झाला आणि म्हणून तो विद्यापीठाच्या परीक्षेला बसू शकला नाही. आता त्याच्यापुढे प्रश्न उभा राहिला की, त्याचे सहाध्यायी पुढे गेले होते आणि तो मात्र मागे राहिला होता म्हणून त्याच सुमारास नव्याने सुरू झालेल्या फर्ग्युसन कॉलेजात जायचे त्याने ठरविले. या कॉलेजात वामन शिवराम आपटे (श्रेष्ठ संस्कृत पंडित ) गो.ग.आगरकर, व्ही.बी. केळकर आणि टिळक (नंतर लोकमान्य झालेले ) ही प्राध्यापकमंडळी संस्कृत, इतिहास, इंग्रजी, गणित आणि अन्य विषय शिकवीत.हरीला प्रा.केळकरांचे इंग्रजी शिकवणे फार आवडायचे.नंतरच्या काळी दोघांची दीर्घकाळ मैत्री जमली आणि ते परस्परांशी वाङमयावर चर्चा करीत.

वर उल्लेखिल्याप्रमाणे त्या काळचे लोक रेनॉल्डची पुस्तके वाचीत आणि डेक्कन कॉलेजात असताना हरीने "मिस्टरीज ऑफ दि कोर्ट ऑफ लंडन "वाचलेले होते. आता त्याने त्याच्या पाहिल्या दोन प्रकरणांचे भाषांतर केले. त्याचा हा प्रयत्न त्याच्या मित्रांना आवडला. श्री.वैद्य याने ती दोन भाषांतरीत प्रकरणे पुणे वैभव च्या संपादकाला दाखवली आणि त्यांनीही ती लगेच "मधली स्थिती " या नावाने आपल्या पत्राची पुरवणी म्हणून छापली. या प्रकाशनाने

मोठी खळबळ उडाली.राव बहादुर व्ही.एम्.महाजनी आणि के.एन्.साने यांच्यासारख्या प्रसिध्द लेखकांनी या अनाम लेखकाचे अभिनंदन करणारी पत्रे संपादकाकडे पाठवली. "नाट्य कथार्णव" च्या संपादकानेही लेखकाचे अभिनंदन केले आणि पुढील प्रकरणाची आपण वाट पाहात असल्याचे कळवले." पुणे वैभव" च्या ज्या अंकत हरीची दोन प्रकरणे प्रसिद्ध झाली होती त्याच अंकात त्याने कादंबरीच्या प्रयोजनावर एक लेख लिहिला होता आणि त्यात त्याने व्हिक्टोरिया राणीच्या काळची कल्पना मांडली होती. त्या कल्पनेनुसार समाजाच्या वास्तव चित्रणाच्या द्वारे रंजनाबरोबर समाजिक प्रबोधन करणे हे कादंबरीचे प्रयोजन होते. हरीची कादंबरी तर ती प्रसिद्ध करणाऱ्या (१.रेनॉल्डची अनेक पुस्तके मराठीत भाषांतरित झाली होती. या रेनॉल्डचा उल्लेख इंग्रजी वाङमयाचे इतिहासकार करीत नाहीत,पण तो त्या काळी फार लोकप्रिय होता.) पत्राच्या धोरणाच्या विरोधी होती,पण वाचकांचा अनुकूल प्रतिसाद इतका प्रचंड होता की त्या पत्रातूनच ती कादंबरी प्रसिद्ध झाली. पण एका दृष्टीने त्या पत्राच्या संपादकालाही ती कादबंरी आवडली; कारण तिच्यातील वकील, डॉक्टर, सरंजामशाही जमीनदार,कंजूष सावकाराचा उधळया मुलगा इत्यादी पात्रे पुण्यात वावरणाऱ्या काही जिवंत हाडामासाच्या व्यक्तींच्या सारखी होती.वाचक वर्गात या कादंबरीने इतकी खळबळ उडविली की साऱ्या महाराष्ट्र भर तिचा बोल बाला झाला. कारण त्यात त्या काळच्या महाराष्ट्र समाजाच्या विविध थरांचे उत्तम चित्रण केलेले होते. त्यातली शब्दचित्रे थक्क करण्याइतकी जिवंत उतरली होती. एका वेश्येच्या घरातील जीवन तर असे काही रंगवलेले होते की पुण्यातली खुद्द एक वेश्याही चकीत झाली. हरीच्या कुटुंबातील कुणालाही या कादंबरीच्या लेखकाचे नाव माहित नव्हते.जसे इकेलीन लिहिल्याचे फॅनी बर्नीच्या वडिलांना माहित नव्हते किंवा जेन आयर ची लेखिका आपली मुलगीच आहे ही चॅर्लोटी ब्रॉंटीच्या वडिलांना माहित नव्हते.) या रीतीने या कादंबरीच्या प्रकाशनाने हरीचे नाव झाले पण कॉलेजच्या अभ्यासाकडे दुर्लक्ष झाल्यामुळे तो पुनः एकदा पहिल्या वर्षाच्या परीक्षेत गणित विषयात नापास झाला. या अपयशाने हरीचे चुलते भलतेच नाराज झाले आणि त्यांनी त्याला पुनः डेक्कन कॉलेजात जायला सांगितले. या वर्षी तेथे तो प्रिलिमिनरी परीक्षेत उत्तीर्ण झाला आणि म्हणून त्याला विद्यापीठाच्या परीक्षेस बसण्यास परवानगी मिळाली.पण जरी संस्कृत,इंग्रजी आणि इतर काही विषयात तो पास झाला तरी तिसऱ्यांदा गणितात नापास झाला.यानंतर दोनदा तो बाह्य विद्यार्थी म्हणून परीक्षेस बसला.पण या ही वेळी तो नापास झाला आणि अखेर १८८६ साली कॉलेज सोडण्याचे ठरवून विद्यापीठीय शिक्षणाला त्याने रामराम ठोकला.त्यामुळे त्याचे चुलते भलतेच नाराज झाले आणि आपल्या पुतण्याच्या वाङमयीन गुणवत्तेला महत्त्व देणाऱ्या रावबहादूर कानिटकरांशी बोलण्याची त्यांनी संधी मिळवली.हरीने बी.ए.एल्.एल्.बी.व्हावे आणि नंतर

मुंबईच्या उच्च न्यायालयात वकिली करावी यासाठी त्याचे मन वळविण्याची त्यांना विनंती केली. असे केल्याने हरीच्या कुटुंबाद्दलची त्याच्या चुलत्याची काळजी कमी झाली असावी पण असे व्हावयाचे नव्हते; आणि अखेरीस १८८६ साली हरीने कॉलेज शिक्षणाला रामराम ठोकला.

१८८३ सालीच चुलत्यांच्या गावी, म्हणजे मुबईला कानिटकर वकिली करीत असतांना त्यांच्याशी हरीचा परिचय झाला होता. ते हरीहून साधारण १२ वर्षांनी मोठे होते, पण वाङ्मयावरील प्रेमामुळे ते जवळ आले होते आणि त्यातूनच त्यांची मैत्रीही जमली. कानिटकरांनी पुढे सबजज झाल्यावर मुंबई सोडली,पण त्यांची मैत्री १९१७ सालपर्यंत टिकली. आगरकरांचे हॅम्लेटचे मराठी भाषांतर पुण्याच्या आर्यभूषण छापखान्यात छापली जात असतानांच त्या दोघांनी ते वाचले होते. या भाषांतरापेक्षा सरस भाषांतर करणे शक्य आहे असे हरीला वाटले. आणि ते कानिटकरांनी महिन्याभरात करावे आणि ते त्याच प्रकाराच्या टाइपात पण चांगल्या कागदावर छापावे असे त्याच्या मित्रांनी ठरविले. नंतर " गणपतराव" या कादंबरीत कानिटकर दांपत्यावरून विष्णूपंत आणि लक्ष्मीबाई ही व्यक्तिचित्रे रेखाटली.

सौ. कानिटकरांनीही ' रंगराव ' नावाची कादंबरी लिहावयाला घेतली होती. पण जेव्हा त्यांनी हरीची " मधली स्थिती " वाचली तेव्हा आपली कादंबरी हरीभाऊंच्या कादंबरीशी बरोबरी करू शकणार नाही किंवा हरीचे वाङमयीन गुण तिच्यात उतरणार नाहीत या कल्पनेने त्या नाउमेद झाल्या. ही गोष्ट जेव्हा हरीला कळली तेव्हा त्यांनी काशीबाईंना उत्तेजनपर पत्र पाठवून कादंबरी पुरी करावयाला सांगितले. त्या पत्रात सौ. कानिटकरांची थोडी जादा स्तुती होती, पण त्यामुळे त्यांना कादंबरी पुरी करण्याचा धीर आला.

# वाङ्मय क्षेत्रात प्रवेश

१८८६ साली कानिटकरांनी हरि नारायण आपटे यांच्यासारख्या मित्रांच्या साह्याने "मनोरंजन" नावाचे मासिक काढले. या मासिकाच्या संपादनात आपट्यांचा मोठा वाटा होता. पहिल्याच अंकापासून श्रीमती कानिटकरांची "रंगराव" आणि आपट्यांची "गणपतराव" अशा दोन कादंबऱ्या क्रमशः प्रकाशित होऊ लागल्या. आगरकरांनी या मासिकाच्या पहिल्या अंकाची प्रशंसा केली आणी आपटे आणि कानिटकर दंपती यांच्या विषयी मित्रांच्याजवळ वाखाणणी केली. १८८३ साली निघालेल्या "निबंधचंद्रिका" मासिकाशीही आपट्यांचा संबंध होता. मराठी वाङ्मयाचे धुरीण कै.विष्णुशास्त्री चिपळूणकर आणि त्यांचे प्रख्यात मासिक "निबंधमाला" यांच्या स्मरणार्थ ते काढलेले होते. या मासिकाला अनेक अडचणींना तोंड द्यावे लागत होते आणि. म्हणून आपट्यांच्या प्रयत्नांनी १८८७ साली "मनोरंजन" आणि " निबंधचंद्रिका " ही एक केली गेली. या संयुक्त मासिकाचे प्रकाशन १८९२ पर्यंत चालू होते. त्यात आपटे यांनी आपली "गणपतराव"ही कादंबरी, चाणाक्षपणाचा कळस, तसेच "जयध्वज श्रुतिकीर्तिचरित्र" आणि "सुमति विजय" (कॉंग्रीव्हच्या "दि मोर्निंग ब्राईड", व्हिक्टर ह्यूगोच्या "हनीनी" आणि शेकस्पिअरच्या "मेझर फॉर मेझर" यांवर आधारलेली ) ही नाटके मारून मुटकुन वैद्यबुवा आणि "पळपुट्या वैद्य", हे फार्स आणि काही कथा, एक निबंध आणि काही कविता या मासिकात प्रसिद्ध केल्या. जेव्हा कानिटकर अहमदनगर जिल्ह्यातील नेवासे येथे सबजज होते तेव्हा आपटे त्या कुटुंबाकडे सहा आठवडे राहिले आणि त्या अवधीत बहुतेक सर्व वेळ शेकस्पिअर आणि तुकाराम हे कवी, मिल आणि स्पेंसर यांचे तत्वज्ञान, समकालीन राजकारण यांवर चर्चा करण्यांत घालविला. किंबहुना त्यात पार्थिव सृष्टीतील सर्व प्रश्न चर्चिले गेले.

१८८८ च्या प्रारंभी आपट्यांनी कॉलेजला कायमचा रामराम ठोकल्यावर प्रकाशन व्यवसाय सुरू करावे असे त्यांच्या मनाने घेतले. सौ. कानिटकरांच्या एका पत्रात याला आधार सापडतो. "कुलकर्णी आणि मंडळी" या उद्योगधंद्याच्या पांच संस्थापक सभासदांपैकी आपटे

हे एक होते. चरित्रांची एक माला प्रकाशित करण्याचा विचार होता. आपटे यांना "करमणूक" काढावयाचे होते, कारण महाराष्ट्रातील कमी शिकलेल्यांना करमणूक करणारे आणि उदात्त स्वरुपाचे वाङ्मय वाचावयाला मिळावे अशी त्यांची इच्छा होती. त्यांच्या मते राजकारण हे काही सर्व लोकांचे सर्वस्व नव्हते, आणि ती त्यांची गरजही नुकत्याच निघालेल्या टिळकांचा "केसरी" आणि आगरकरांचा "सुधारक" यांनी भागत होती.

आपटे हे स्वाभिमानी गृहस्थ होते. ते प्रकाशनांचा धंदा सुरू करीत असल्याचे जेव्हा त्यांच्या चुलत्यांना कळले तेव्हा त्या जोखमीची जबाबदारी आपण घेणार नाही असे त्यांनी त्यांना पत्राने कळवले. त्यावर आपट्यांचा त्यांच्या चुलत्याशी कडाक्याचा वाद झाला आणि आपल्या योजनांचे आर्थिक ओझे त्यांच्यावर घालण्याची आपली इच्छा नाही, असे त्यांनी त्यांना स्पष्ट सांगून टाकले. त्यांचा स्वतंत्र बाणा आणि आत्मविश्वास व्यक्त करणारा आणखी एक प्रसंग आढळतो. जेव्हा आनंदाश्रम सुरू केला तेव्हा आपटे आश्रमाच्या आवारात राहात होते. तेथे त्यांच्याकडे जमणाऱ्या मित्रांची संख्या फार मोठी होती. एकदा त्यांना त्यांच्या चुलत्यांनी या मित्रमंडळीच्या सहवासात पाहिले आणि या प्रकारे वेळ घालवण्याबद्दल आपल्या पुतण्याजवळ नाराजी व्यक्त केली. लागलीच आपट्यांनी शेजारच्याच चौकात एक खोली भाड्याने घेतली. या गोष्टीमुळे त्यांच्या चुलत्यांना वाईट वाटले, आणि एका पत्रातून त्यांनी आपला दृष्टिकोन स्पष्ट केला. त्यात समाजसुधारणावादी, श्रीमंत-आळशी किंवा रावसाहेब आणि रावबहादूर यांच्यापासून दूर राहण्याचा आपल्या पुतण्याला उपदेश केला. खऱ्या मित्राच्या विरुद्ध ते नव्हते, आणि तसा त्यांचा उपदेशही योग्य वेळी केला गेला होता.

स्वभावतःच आपटे निंदानालस्ती आणि शिवीगाळ यांच्या विरुद्ध होते, आणि त्या काळी लोकहितवादी (गोपाळराव हरी देशमुख ) ज्योतिबा फुले किंवा आगरकर असे जे प्रख्यात समाजसुधारक होते त्यांच्या पद्धतीही त्यांना मान्य नव्हत्या. गोड बोलून आणि मतपरिवर्तन करून लोकांच्याकडून हितकारक गोष्टी करवून घ्याव्यात आणि अशा रीतीने समाजाचे हिंत साधावे असे त्यांना वाटे. 'करमणूक' हे साप्ताहिक काढण्यामागील त्यांची भूमिकाही हीच होती. त्यावेळी आपटे फक्त २४ वर्षांचे होते आणि म्हणून स्वाभाविक आशावादी होते. त्यांच्या कल्पना हळूहळू स्पष्ट आणि निश्चित होत होत्या आणि त्यांची निष्ठा ईप्सित गोष्टी करावयाला त्यांना प्रेरणा देत होती. असे करण्यानेच सभोवतीचा अवकळेने बरबटलेला समाज सुधारेल आणि अंतिम भारतीय राजकीय स्वातंत्र्याचा पाया घालील असेही त्यांना वाटे, त्यांच्या लेखणीने अखेर हे उद्दिष्ट साध्य करण्यात यश मिळवले.

"करमणूकीचा" पहिला अंक शनिवार ३१ ऑक्टोबर १८९० रोजी निघाला आणि तो दिवस दसऱ्याचा होता. त्यानंतरचा प्रत्येक अंक दर शनिवारी प्रसिद्ध होऊ लागला. त्याच्या

मुखपृष्ठावर एक संस्कृत अवतरण असे. त्याचा अर्थ असा होता की लोकांनी जरी कठोर भाषा वापरली किंवा तर्कवादाने आपली बाजू मांडली तरी आम्ही फक्त गोड शब्दांचाच अवलंब करू.(या रीतीने आम्ही वाचकांना संतुष्ट करू.) पहिल्याच अंकाने "करमणुकींचे" उद्दिष्ट स्पष्ट केले. ते उद्दिष्ट म्हणजे केवळ व्यावहारिक ज्ञान न देता शास्त्राचे ज्ञानही देणे, आणि तेही पोरकट, स्वैर किंवा तांत्रिक भाषेत नव्हे तर लोकांना आवडणाऱ्या व रस वाटेल अशा भाषेत देणे; यायोगे प्रत्येक आठवड्याचा अंक स्त्री-पुरुष आणि मुले निःसंकोचपणे वाचू शकतील. त्यातून पाश्चात्य आणि पौर्वात्य भाषांतील उत्तमोत्तम नाटके आणि कल्पित कथाही प्रसिद्ध होतील, ज्यांना लिहिता-वाचता येते त्यांची करमणूक होईल. या साप्ताहिकात लघु आणि दीर्घ कथा,विज्ञानविषयक शैक्षणिक बातमी, नाटके, कोटीवचने आणि विनोद, श्रेष्ठ पुरुषांची चरित्रे, प्रवासवर्णने, कविता, बायकांचे पान, खेळाविषयीची माहिती, आठवड्याची बातमी आणि इतर उपयुक्त माहितीही देण्यात येईल.

आपट्यांची "पण लक्षात कोण घेतो ?" ही कादंबरी करमणुकीतून क्रमशः प्रसिद्ध झाली. विशेष गमतीची गोष्ट अशी की, पहिल्या वर्षाच्या बहुतेक सर्व अंकातून प्रसिद्ध कवी केशवसुत यांच्या कविता प्रसिद्ध झाल्या. न्या. काशीनाथ त्र्यंबक तेलंग, प्रो.व्ही.बी.पटवर्धन, श्रीमती रमाबाई रानडे, सौ.काशीबाई कानिटकर आणि इतर अनेक विख्यात व्यक्तींनी या साप्ताहिकाची फार प्रशंसा केली. 'मी', 'भयंकर दिव्य', 'जग हे असे आहे', 'म्हैसूरचा वाघ', 'रुपनगरची राजकन्या', 'केवळ स्वराज्यासाठी', या काही आपट्यांच्या कादंबऱ्या पुढील बारा वर्षात या साप्ताहिकातून क्रमशः प्रसिद्ध झाल्या. इतर सामाजिक आणि ऐतिहासिक नाटके आणि कादंबऱ्या याही याच साप्ताहिकातून प्रकाशित झाल्या. हे साप्ताहिक २७ वर्षे (म्हणजे १९१७) पर्यंत चालले आणि आपट्यांनी त्याच्या चेहऱ्यामोहऱ्यात फरक पडू दिला नाही. अनेक स्त्रियांनी आपले लेखन यात प्रसिद्ध केले आणि अनेक मुला-मुलींकडून त्याचे अंक दीर्घ काळपर्यंत आवडीने वाचले जात होते. मागचे अंक वाचण्यात तर एक प्रकारची मेजवानीच वाटे.

आता आपण लेखक व्हायचे असा आपट्यांचा निश्चय झाला होता. पण हा व्यवसाय कुटुंब पोषणाची जबाबदारी पार पाडण्यास पुरेसा नव्हता आणि म्हणून अखेरचा आधार म्हणून शिक्षक व्हायचे त्यांनी ठरविले. पण त्यातही भवितव्याची खात्री नव्हती. त्यानी वकिलीची पदवी घेऊन वकिली करावी अशी त्यांच्या चुलत्यांची इच्छा होती. पण ते तर विद्यापीठाची पहिली परीक्षाही उत्तीर्ण होऊ शकले नव्हते. त्याच्या वडिलांनाही ते नापास का होतात हे समजत नव्हते. एकदा दोघांनीही त्यांच्याशी याविषयी बोलण्याचा प्रयत्न केला पण आपण तूर्तास कुठेही नोकरी करीत नसलो तरी आपण मिळवू शकू असे सांगून पुढील वाद त्यांनी संपविला. तरीही काही दिवस छापखान्यातील कामाचा अनुभव घेऊन त्यांनी छापखान्याच्या धंद्यात

पडावे असेही चुलत्यांनी सुचवून पाहिले. तेव्हा जगदीश्वर छापखान्यात चुलत्यांच्याच प्रयत्नाने त्यांना उमेदवार म्हणून घेतले गेले. पण मुद्रणाच्या परीक्षेतही ते उत्तीर्ण होऊ शकले नाहीत. छापखान्यातील रुक्ष वातावरणात काम करण्यास त्यांचे मन रमेना. प्रकाशनसंस्था काढण्यासाठी अवश्य ते भांडवल पुरविण्याचेही चुलत्यांनी सांगून पाहिले, पण आपट्यांनी त्यालाही नकार दिला. आता मात्र आपट्यांचे वडील आणि चुलते दोघेही निराश झाले; पण चांगली मिळकत असणाऱ्या त्यांच्या चुलत्यांना आपल्या पुतण्याची वाङ्मयातील गती आणि विशषतः त्यांचे संस्कृतचे ज्ञान माहित होते आणि म्हणून त्याच्या वाङमयीन गुणवत्तेला पोषक अशी संस्था काढून त्याच्या योगक्षेमाची व्यवस्था करण्याचे त्यांनी आपल्या भावाला आश्वासन दिले. आपण आपल्या साऱ्या कुटुंबासाठी काही करीत नसल्याची टोचणी चुलत्यांनाही लागलेली असल्याने आपण 'आनंदाश्रम' या नावाने एक विश्वस्तसंस्था काढण्याचे आणि आपल्या अधार्मिक वृत्तीचे प्रायश्चित्त घेण्याचे ठरविले. धार्मिक वाङमय आणि प्राचिन संस्कृत ग्रंथ यांच्या प्रकाशनार्थ एक छापखाना विद्यार्थी आणि पांथस्त संन्यासी यांची राहाण्याजेवण्याची व्यवस्था असणारे एक वसतिगृह आणि एक शिवमंदिर ही नियोजित संस्थेची प्रमुख लक्षणे होती. शहराच्या मध्यवस्तीत लवकरच रु.५०००/- ला जागा विकत घेतली जाऊन दोन वर्षांत संस्थेची इमारत पुरी झाली. शके १८१० च्या कार्तिक शुद्ध प्रतिपदेला वास्तुशांती होऊन छापखान्याचे उद्घाटनही झाले. या रीतीने आनंदाश्रम अस्तित्वात आले. जेव्हा १७ मे १८८७ रोजी संस्थेची उद्दिष्टपत्रिका प्रसिद्ध झाली तेव्हा केसरीने या नव्या धाडसाचे आपल्या अग्रलेखातून स्वागत केले आणि धार्मिक आणि संस्कृत ग्रंथाच्या प्रकाशनाची व्यवस्था केल्याबद्दल महादेव चिमणाजी आपटे यांची प्रशंसा केली. ही संस्था चालवण्याचे काम हरीच्या चुलत्यांनी बारीकसारीक सूचनांच्यासह त्यालाच सांगितले. तसेत त्यांना संस्थेचे व्यवस्थापक तर नेमलेच, पण त्या जोडीला आपटे कुटुंबातील मुलांना वाढविण्याची जबाबदारीही त्यांच्यावरच सोपवली. आता आपट्यांना शाळा सोडून आर्थिक व्यवस्थापन, मुद्रण, पत्रव्यवहार, हस्तलिखितांचा संग्रह, ग्रंथांची तुलना, ग्रंथसंग्रहालय, पुस्तके आणि हस्तलिखिते यांची खरेदी-विक्री, मासिक जमाखर्च यांच्याकडे लक्ष पुरवायाचे होते. पाहुण्यांचे आगत स्वागत करणे आणि त्यांना आनंदाश्रमाच्या कामकाजाची माहिती देणे हेही त्यानेच करावयाचे होते. त्यासाठी सकाळी ११ ते सायंकाळी ५.३० पर्यंतची उपस्थिती आवश्यक होती. त्याचा पगार महिना रु.३०/-ला सुरू होऊन तो रु.१००/- पर्यंत वाढणार होता. या प्रकारे माफक का होईना पण उत्पन्नाची निश्चिती होती. आपटे आता पुण्याला कुटुंबचालक झाले. आनंदाश्रम-संस्कृत-भाषेची सुरूवात गणपती अथर्वशीर्षाच्या शुभमुद्रणाने झाली. मंदिरही उभारले गेले आणि ते असे काही बांधले होते की पुजेचे तीर्थ

त्यांच्या चुलत्यांच्या समाधीवर पडून ते शुद्ध होणार होते. अशा प्रकारची समाधी बांधण्यासाठी अवश्य ती सरकारची परवानगी आधीच घेऊन ठेवलेली होती. १८९० पासून त्यांच्या चुलत्यांची प्रकृती खालावत होती. बापट आयोगाच्या निमित्ताने बडोद्याला होणाऱ्या सफरींच्यामुळे १८९४ च्या ऑक्टोबरात आणखीनच ढासळली. त्यांना टायफॉईड झाला आणि औषधोपचार करूनही ते २२ ऑक्टोबरला मृत्यू पावले. पूर्वनिर्णयानुरूप त्यांनी मरणापूर्वी संन्यास घेतला होता. हरीभाऊ आपटे मुंबईला धावले आणि अखेरपर्यंत त्यांच्याजवळ होते. मृताचा देह पुण्याला आणला गेला आणि संन्याश्याला योग्य तो विधी केल्यानंतर आधीच तयार करून ठेवलेल्या समाधीत महादेव चिमणाजींचा देह ठेवला गेला. लवकरच आनंदाश्रम ही संस्था भरभराटीला आली अद्याप ती आपली काम शांतपणे आणि गाजावाजा न करता करीत आहे. या थोर संस्थेमुळे जणू संस्कृतचा व्यासंगच महादेव चिमणाजी आपट्यांचा ऋणी आहे. आपट्यांनी चुलत्यांची आज्ञा प्रामाणिकपणे पाळली आणि सामाजिक सुधारणेच्या आपल्या कल्पना बाजूला ठेऊन संस्था चालवण्यासाठी हिंदूंचा सनातनी जीवनक्रम पत्करला आणि आपल्या नामांकित चुलत्याच्या स्मरणार्थ म्हणून उभारलेल्या या संस्थेची वाढ केली. कारण त्यांच्या देणगीमुळेच त्याच्या पुढील जीवनात एक प्रकारचे स्वास्थ लाभले. त्यामुळेच त्यांना प्रख्यात लेखक होता आले, कुटुंबाची जबाबदारी पेलता आली, आणि त्याचबरोबर आजचे संस्कृतचे ज्ञान भारतीय संस्कृतीच्या प्रगतीच्या कारणी लावता आले.

आपट्यांच्या पत्नीला पतीच्या इच्छेनुरूप लिहायला-वाचायला शिकण्याची फार इच्छा होती. पण घरात सभोवती असणाऱ्या सनातनी रूढीप्रिय बायकामंडळीच्यामुळे आपला अभ्यास उघडपणे करणे तर कठीण होतेच पण शिवाय तिला त्यांच्याकडून होणाऱ्या निंदानालस्ती आणि उपहास यांना तोंड द्यावे लागे. आपल्या बायकोने खूप वाचावे आणि चतुरपणे संभाषण करावे असे आपट्यांना फार वाटे. जरी तिला साहित्यिक गप्पात भाग घेणे कठीण असले तरी सामाजिक कार्यक्रमात आपली मित्रमंडळी आणि त्यांच्या बायका यात तिने भाग घ्यावा अशी त्यांची अपेक्षा होती. काही वेळी कुटंबातील इतर बायकांच्या नकळत ते तिला अशा बैठकांना किंवा सार्वजनिक सभांना घेऊन जात. पण घरातील वडीलधाऱ्या बायकांना परत येण्याआधीच ती कुठे गेली होती हे कळत असे. त्या काळी घराच्या पावित्र्याच्या कल्पना फारच कडक, दुराग्रही किंबहुना विकृत असत. त्यामुळे जरी घरी परतल्यावर मथू कपडे बदलीत असली तरी तिला घरात मोकळेपणी वावरता येत नसे आणि त्या हट्टी, रूढीप्रिय सनातनी म्हाताऱ्यांमुळे घरातील कामही करता येत नसे. स्वाभाविकच तिला फार अवघडल्यासारखे होई. त्यामुळे पतीची इच्छा पुरवणे आणि पुनः रूढीग्रस्त बायकांशी जुळते घेणे या दोन्ही गोष्टी असफलच राहात. घरातल्या या कडक निर्बंधामुळे नेमून दिलेला

अभ्यास तिला पूर्ण करता येत नसे आणि मग ती फार कष्टी होई. अनेक वेळा मथू आपल्या नवऱ्याला आनंदाश्रमात वेगळे स्वतंत्र बिऱ्हाड करण्याचा आग्रह धरी; कारण तसे करण्याने त्यांना आपल्या जीवनाला आपल्या कल्पनेनुसार आपली आवडीनुसार वळण देता आले असते. पण एकत्र कुटुंबातील वडीलधाऱ्यांच्या भावना दुखवण्याला तयार नसल्यामुळे बरेच दिवस आपटे या गोष्टीला कबुल झाले नाहीत आणि घरातील कुचंबणेचे वातावरण निवळले नाही.बिचारी मथू चरफडली आणि निराश झाली. ती फार भित्री आणि बुजरी होती आणि म्हणून ती एकांतात अश्रू ढाळी.

त्यांचे पहिले मुल - मुलगा होता तो जन्मानंतर अवघ्या तीन महिन्यातच वारला. फेब्रुवारी १८९१ मध्ये त्यांना दुसरा मुलगा झाला; पुढे त्यांची बायको बाळंतरोगाने आजारी झाली, आणि कितीही औषधोपचार केले तरी अखेर त्यातच गेली.मूल काही काळ जगले पण अशक्तपणामुळे तेही फार दिवस न जगता एक महिन्यांनी वारले.

प्रथम पत्नीच्या आणि तिच्या पाठोपाठ झालेल्या मुलाच्या मृत्यूने आपट्यांना धक्का बसला आणि मनाने ते फारच अस्वस्थ झाले. दुःखाने ते घायाळ झाले आणि त्याचा परिणाम ते आजारी पडण्यात झाला. त्यांना एकदम श्वासोच्छ्वास बंद झाल्यासारखे वाटून गुदमरल्यासारखे होई. आपण आपल्या मृत पत्नीला स्वतंत्र जीवन देऊ शकलो नाही या जाणिवेने ते अधिकच उदास होत. पण आता या चुका दुरुस्ती करण्याच्या पलीकडे गेल्या होत्या. आणि त्यांच्या ध्येयवादी उत्कंठेची परिणती मनाच्या गोंधळात, भीतीत आणि निराशेत झाली होती. त्याचे प्रायश्चित्त म्हणून त्यांनी साखर आणि पान खाणे सोडले, रात्री जमिनीवर चटई टाकून झोपू लागले. ह्या पश्चातापाच्या आणि निराशेच्या मनःस्थितीतून बाहेर पडण्यास त्यांना खूप दिवस लागले.

त्याच वर्षाच्या मे महिन्यात कानिटकर कुटुंबाने त्यांना महाबळेश्वरला राहायला बोलाविले. त्याचा परिणाम त्यांची प्रकृती काही प्रमाणात सुधारण्यात आणि निराशेवर मात करण्यात झाला. तेथले नैसर्गिक सौंदर्य आणि कानिटकरांनी आपुलकीपूर्वक घेतलेली काळजी यांनी त्यांचे दुःख विसरावयाला खूप मदत झाली आणि सौ.कानिटकरांच्या आग्रहाने त्यांनी आपल्या चहात आणि जेवणात साखर पुनः घ्यायला सुरुवात केली. महाबळेश्वरला श्रेष्ठ विद्वान आणि सुधारक न्या.मू. महादेव गोविंद रानडे वरचेवर भेटत आणि काही वेळा कानिटकरांच्याकडे जेवणाला असत आणि कधी कानिटकर कुटुंब आणि आपटे यांना आपल्याकडेही भोजनाला बोलावीत. आपल्या एका सुधारक मित्राच्या वयाने वाढलेल्या मुलीशी आपट्यांनी लग्न करावे अशी रानडे यांची इच्छा होती. ते यासंबंधी सौ. कानिटकरांशी बोललेही. सौ. कानिटकर मोठ्या समंजस होत्या आणि त्यांनी रानड्यांना सांगितले की घरच्या सनातनी वातावरणामुळे ही गोष्ट

आपट्यांना मान्य होणार नाही. तथापि जेव्हा आपटे पुण्याला परतले, तेव्हा घरातल्या वडिलधाऱ्यांच्याकडून दररोज या ना त्या स्थळासंबंधी सूचना केल्या जाऊ लागल्या. त्यापैकी कुणालाच त्यांची मानसिक अवस्था आणि लग्नाबाबतची नाराजी कळत नव्हती. विधुर राहिलेल्या मुंबईच्या त्यांच्या चुलत्याचे उदाहरण त्या लोकांपुढे होते आणि म्हणून आपट्यांचे वडील आणि इतर नातेवाईक याबाबत फिकिरीत होती. त्यांच्या आजीनेही डोके उठवले. आपटे तिला फार मानीत आणि अखेर त्यांना तिला वचन द्यावे लागले की, ते तिची अवज्ञा करणार नाहीत की तिच्या शब्दाबाहेर जाणार नाहीत. त्यांनी अनेकवेळा बालिकाविवाहाचा निषेध केला होता आणि स्वतःही त्या काळच्या प्रथेप्रमाणे कोमल वयाच्या मुलीशी लग्न करण्यास त्यांचे मन तयार होत नव्हते. म्हणून त्यांनी धकाधकीच्या सार्वजनिक जीवनात उडी घेण्याचे ठरविले. येथे एका गोष्टीचा उल्लेख केला पाहिजे: ती म्हणजे गोपाळराव जोशी यांनी उघडकीला आणलेली 'पंचहौर मिशन प्रकरण' नावाने ओळखिली जाणारी गोष्ट. त्यांनी पुण्यातील ख्रिस्ती मिशनमध्ये व्याख्यान आणि चहापान यांची योजना केली. तेथे रोव्हिंगटन या फादरकडे आपटे फ्रेंच शिकत असत. त्या व्याख्यानासाठी न्या.मू. रानडे ,लोकमान्य टिळक, प्रा.व्ही.बी.केळकर,प्रा.पानसे,प्रा.जी.के.गोखले,वासुदेवराव जोशी आणखी अन्य काही मान्यवर गृहस्थ बोलाविले गेले होते. काहींनी चहा आणि बिस्किटे घेतली. आपट्यांचा पुतण्या त्याच दिवशी वारल्यामुळे ते त्या व्याख्यानासाठी व चहासाठी हजर राहू शकले नाहीत. गोपाळरावांनी पुण्याच्या"पुणे वैभव या सनातनी नियतकालिकात जे हजर होते आणि जे हजर नव्हते त्या साऱ्यांची नावे छापून आणली", आणि त्या चहापान प्रकरणाचे मोठे वादळ उठले. त्याचा परिणाम म्हणून पुण्यातील बेचाळीस कुटुंबाना सनातनी लोक आणि पुरोहित वर्ग यांनी वाळीत टाकले. पुरोहितांनी या लोकांच्या घरी धर्मकृत्ये करण्याचे नाकारले आणि जवळचे नातेवाईक, मित्र आणि अन्य लोक यांनी त्यांच्यावर बहिष्कार घातला. त्या साऱ्यांचे जीवन, त्यातल्या त्यात स्त्रियांचे, मोठे दुःखी झाले. धर्म कृत्ये होईनात, लग्न झालेल्या मुलींना आमंत्रणे येईनात किंवा आले तरी त्या जाऊ शकेनात आणि पालक आणि मुले ही एकापरीने परस्परांपासून दूर झाली. मोठी दुःखद अवस्था निर्माण झाली आणि ही सारी कुचंबणूक दूर झाली ती जेव्हा न्या.मू.रानडे पुढे झाले, आणि म्लेंच्छाकडे चहा-बिस्किटे खाल्याबद्दल त्यांनी प्रायश्चित्त घेतले तेव्हा. इतरांनीही मग तोच मार्ग अवलंबिला आणि १८९२ च्या मार्च महिन्यात त्यांच्यावरील बहिष्कार उठला. आपटे जरी त्या चहा-बिस्किटप्रकरणी हजर नव्हते, तरी 'पुणे वैभव' मध्ये त्यांचे नाव छापून आले होते.

आपट्यांचे वडील नानासाहेब हे या तथाकथित सहभागाबद्दल फारच रागावले. आपट्यांच्या घरची सर्व धार्मिक कृत्ये थांबली. परिणामतः त्यांची आजी आजारी पडली आणि

त्यातच तिचा अंत झाला. आश्चर्यकारक योगायोग म्हणून सांगितला जातो तो असा की आपट्यांची ती आजी त्यांच्या स्वप्नात आली आणि आपण आता हे जग सोडीत असल्याचे तिने त्यांना सांगीतले. स्वप्नामुळे दचकून ते उठले आणि खाली जाऊन किती वाजले म्हणून त्यांनी पहारेकऱ्याला विचारले. त्याने पहाटेचे दोन वाजल्याचे सांगितले. एका मिनिटभरातच घरून आजी वारल्याचा निरोप आला. ते आनंदाश्रमात राहात असत आणि घरी फक्त जेवण्यासाठी जात. बहिष्कारामुळे मोठ्या मुश्किलीने ब्राह्मण भटजी मिळवले. तथापी शंकराचार्य आयोगानेच त्यांना चहा-बिस्किटे खाणे सोडाच पण ते हजरही नसल्याने दोषमुक्त केले. आपट्यांच्या चुलत्यांनीही ते व्यख्यानाला हजर नव्हते किंवा चहाही त्यांनी घेतला नाही असे छापवून आणले.आपट्यांना स्त्रीशिक्षणात रस होता आणि म्हणून त्यांच्या वाढीच्या संबंधातील कोणत्याही योजनेला ते मनापासून हातभार लावीत. याच कारणासाठी पंडिता रमाबाईंच्या (ज्या नंतर ख्रिस्ती झाल्या) प्रयत्नांची आणि त्यांच्या संस्थेची पुण्याच्या सेवासदनची ते प्रशंसा करीत.न्या.मू.रानडे,प्रा.भांडारकर,प्रि.आगरकर आणि न्या.पू.काशिनाथ त्र्यंबक तेलंग सारखी पुण्यातील अनेक नामांकित मंडळी सेवासदनच्या शैक्षणिक कार्याबद्दल सहानुभूती बाळगीत. पण नंतर जेव्हा, अनेक हिंदू तरुण मुलींना सेवासदनात ख्रिस्ती करण्यामागे रमाबाई आहेत हे सिद्ध झाले,तेव्हा या सर्व हिंदू पुढाऱ्यांनी या गुप्तपणे होणाऱ्या धर्मांतराचा निषध केला आणि धर्मांतर करणाऱ्या या ख्रिस्ती संस्थेशी संबंध सोडला.

आनंदाश्रमातील कामामुळे सामाजिक सुधारणेसाठी एखाद्या विधवेशी विवाह करणे आपट्यांना अशक्य झाले. शिवाय अशा विवाहामुळे आपल्या सर्व नातेवाईकांशी त्यांचे संबंध पूर्णपणे तुटले असते.त्याने असा विवाह करू नये, म्हणून त्यांचे नातेवाईक त्यांचे लग्न उरकण्यास उत्सुक होते. १८९१ च्या नागपूर काँग्रेसच्या आधिवेशनाला तो गेलेला असतांना त्यांच्या मामीने विधवेशी विवाह न करण्याचे नाखुषीने का असेना पण तसे वचन त्यांच्याकडून घेतले होते. तरीही तो लग्नाला लवकर तयार होईना म्हणून त्याचे वडील, चुलते आणि इतर नातेवाईक यांनी त्याच्याशी बोलणे सोडले. तो कोटीयुक्त संभाषण करून लोकांना आनंद देणारा असा असल्याने या अबोल्याने तो फार कष्टी झाला अशी ही एकंदर परिस्थिती सुधारण्यासाठी काहीतरी हालचाल करणे अवश्य होते आणि म्हणून त्यांचे मित्र प्रा. पानसे त्यांच्यासाठी शिकलेली मुलगी पाहू लागले. त्यांच्या आढळात श्री.चोळकर नावाच्या गृहस्थाची वेणूताई नावाची एक शिकलेली मुलगी आली. १८९२ च्या फेब्रुवारीत त्यांचे लग्न फारसा गाजावाजा न होता झाले. लग्नानंतर वधूचे नाव 'रमा' असे ठेवण्यात आले. लग्नात हुंडा घेतला गेला नव्हता. आपट्यांचे वडील त्यावेळी बेळगावला होते आणि त्यांना वा चुलत्यांना लग्नाचे काहीच कळवलेले नसल्याने ते कोणीही लग्नाला हजर नव्हते. लग्न

झाल्यानंतर त्यांनी ही बातमी कळवली गेली आणि नवपरिणीत वधूवरांचा गृहप्रवेश बेळगावलाच झाला.

आपट्यांवर त्यांच्या सुधारक मित्रांनी या त्यांच्या सनातनी लग्नाबद्दल टीकेची झोड उठवली. न्या.मू.रानडेही आपल्या सुधारकी मनाप्रमाणे वागू शकले नव्हते हेही ते विसरले. आपट्यांची स्थितीही काही वेगळी नव्हती आणि त्यांनाही कौटुंबिक जबाबदारी लक्षात घ्यावी लागली होती. सुधारणेसाठी तेही उतावळेपणाने वागू शकत नव्हते आणि मनविळावू, प्रेमळ आणि परस्परसहाय्यक अशा तऱ्हेच्या साऱ्या कुटुंबाचा नाश करू शकत नव्हते. या दुसऱ्या लग्नानंतरसुद्धा त्यांची उदासीनता दीर्घकाळ टिकली आणि तिच्यावर मात करण्यासाठी त्यांनी लेखनावर सर्व शक्ती केंद्रित केली. ते घरी यायचे ते केवळ जेवण्यासाठी आणि नेहमीच्या कोटीयुक्तपणे संभाषण करण्यासाठी. पण आता त्यांच्या अन्य काळज्यात दुसऱ्या पत्नीच्या आजारपणाच्या काळजीची भर पडली. तिलाही पतीच्या उदास मनःस्थितीबद्दल फार वाईट वाटले पण याबाबत ती फारसे काही करू शकत नव्हती. तिला चिमा मावशीच्या (आपट्यांची चुलती) कडक शिस्तीखाली वागावे लागे. तिच्या प्रकृतीची आणि औषधाची नवऱ्याने नुसती चौकशी केली तरी घरातल्या सनातनी स्त्रियांकडून विरोधी टीका होई. आपट्यांच्या पत्नीला हे लागणे स्वाभाविक होते. तिच्या वडिलांनी डॉ. आठवले नावाच्या आपल्या स्नेह्याला तिच्यावर उपचार करावयाला सांगितले. डॉक्टरांनी तिला सकाळी फिरावयास जावयास सांगितले, पण त्याचा परिणाम तब्येत अधिक बिघडण्यातच झाला. कारण सकाळच्या फिरण्याबरोबरच घरातील दैनंदिन कामेही करावी लागत. या साऱ्या गोष्टीमुळे तीही उदासपणेच जीवन जगत होती. या जोडप्याने आनंदाश्रमात राहावे ही त्यांच्या वडिलांची सूचनाही अमलात आणता आली नाही. स्वतः आपटेच त्याला तयार नव्हते आणि वेणूची निराशा आणखी काही वर्षे टिकून राहिली. मध्यंतरी १९०२ मध्ये कुटुंबाची जणू अधिष्ठात्री असणारी चिमामावशी जलोदरानी निवर्तली. त्यावेळी आपटे पुण्याबाहेर गेलेले असल्याने ते तिच्या अंतसमयी जवळ नव्हते. ती शिस्तीबाबत कडक असली तरी पक्षपात करणारी नव्हती. तिच्या मृत्यूने वेणूच्या हालअपेष्टात भरच पडली. त्यामुळे ती पुन्हा आजारी पडली आणि मगच आपण आपल्या पत्नीशी नकळतपणे का होईना उदासीन वृत्तीने वागलो याची आपट्यांना जाणीव झाली. अखेरीस त्यांनी तिला आनंदाश्रमात राहावयास नेले. या वेळच्या त्यांच्या मनःस्थितीचे चित्र त्यांनी सौ.काशीबाई कानिटकर यांना जे एक पत्र पाठवले आहे त्यात दिसते. त्यात आपल्या घरी त्यांना सौ. कानिटकरांना बोलवायला कसे असमर्थ आहोत, हे स्पष्ट लिहिले आहे. पुनर्जन्म, मृत्यू इत्यादीपर्यंत त्यांनी त्यात शब्द वापरले आहेत. त्यांच्या निराशेला अंत नव्हता. स्वतःची निराशा आणि खिन्नता कितीही जबर असली तरी पत्नीच्या भावनांच्याकडे

केलेले दुर्लक्ष त्यांना अक्षम्य वाटले. त्यांना पश्चात्ताप झाला आणि आनंदाश्रमात आल्यावर तिची नीट काळजीपूर्वक सूश्रुशा करून त्यानी त्यांची भरपायी करण्याचा प्रयत्न केला. आता १९०३ साली त्यांच्या वैवाहिक जीवनाचे नवे प्रकरण सुरू झाले. वेणूने आपले घर मोठ्या आनंदाने लावले आणि त्यातून आजवर लक्षात न आलेल्या तिच्या मोठ्या गुणांची जाणीव आपट्यांना झाली. १९०३ नंतर त्यांचे जीवन सुखी आणि समाधानी गेले. त्यांची पत्नी त्यांच्या सर्व गरजांकडे, आवडीनावडीकडे लक्ष पुरवी, आणि त्यांच्या आंतरिक इच्छा पूर्ण करण्याची कोशीश करी.

तथापी वेणू पुनः १९०५ मध्ये आजारी पडली. आपट्यांनी तिला प्रकृती सुधारण्यासाठी लोणावळ्याला नेले. १९०६ मध्ये मुलीचा जन्म झाला. पण वेणू पुनः आजारी पडली आणि तिचा ताप टाइफॉईडचा ठरला. सुदैवाने साधारण चार एक आठवड्यानी ती बरी झाली आणि पुनः आपल्या कामाला लागली. मुलीचे बारसे झाले आणि तिचे नाव "शांता" असे ठेवले. आपटे दंपती आता मुलीत पूर्ण रमले. घराला पुनः सुखी असे घरपण आले.

आपट्यांचा दैनंदिन कार्यक्रमही आता समाधानकारकपणे ठरला. ते रोज पहाटे तीन वाजता उठत आणि आपल्या ग्रंथालयात टेबलाशी लिहावयाला बसत. साधारण दोन-अडीच तास लेखन केल्यावर ते खाली काही वेळ चहाला आणि मुलीशी खेळावयाला येत. लवकरच त्यांचे मित्र येत आणि चहानंतर फिरायला म्हणून पर्वतीला जात. (पर्वती म्हणजे पुण्याजवळ त्यावेळी साधारण मैल दीड-मैल दूर असणाऱ्या टेकडीवरील एक देऊळ ) परतताना ते आणि त्यांचे मित्र आणखी काही मित्रांना त्यांच्या घरी जाऊन नियमितपणे भेटत. हा फेरफटका साधारण साडेसातला संपे. त्यानंतर आपटे आपला पत्रव्यवहार पाहात आणि दैनिक वर्तमानपत्रे आणि मासिके वाचीत. मग ते आश्रमातील पांथस्थ संन्याश्यांना भेटत, तसेच इमारतीत राहणाऱ्या विद्यार्थ्यांना आणि अन्य आले गेले त्यांना म्हणजेच पाहुण्यांना भेटत, साधारण साडेदहा वाजता आनंदाश्रमाच्या प्रथेनुसार पाहुण्या संन्याश्यांची पूजा केल्यावर भोजन करीत. साधारण तासाभरात जेवण उरके आणि मग ते आनंदाश्रम संस्थेचे प्रकाशन, मुद्रण, पत्रव्यवहार आणि इतर कामे पाहात. हे काम साधारण संध्याकाळच्या पाच-साडेपाचपर्यंत चाले आणि त्या कामात मध्ये जर वेळ मिळाला तर ते पुस्तकांचे थोडेफार वाचन करीत. दुपारी ३ वाजता चहासाठी थोडी सुट्टी घेत.

संध्याकाळी ५ वाजता त्यांच्याकडे काही मित्रमंडळी येत आणि मग चहा आणि पत्ते किंवा एकूण त्यावेळच्या परिस्थितीवर चर्चा होई. आठच्या सुमारास ती मित्रमंडळी आपापल्या घरी जात. काही विशेष प्रसंगी आपटे आपली पत्नी आणि मुलगी यांसह घोडागाडीतून फिरावयास जात. रात्री जेवण झाल्यावर ते भजन करीत (बहुशः तुकारामाचे अभंग म्हणत) धार्मिक आणि

पवित्र संस्कृत ग्रंथांचे त्यांचे वाचन लक्षणीय होते. रामदासांचा 'दासबोध'ही मोठ्या आवडीने ते वाचीत. सामान्यपणे ते लवकर निजत. असा त्यांचा दिनक्रम अनेक वर्षे चालू होता.

आपट्यांच्या मित्रमंडळीत समाजातील सर्व स्तरातील लोक होते. ते महाराष्ट्रातीलच नव्हते तर गुजरात आणि बंगालमधीलही होते. ते मोठे आतिथ्यशील यजमान होते आणि या त्यांच्या आतिथ्यशीलतेचा फार मोठा भार त्यांच्या पत्नीवर पडे. पाहुणे दररोज येत; जवळजवळ प्रत्येक तासाला त्या जोडीला आपटे कुटुंब मोठे असल्याने काही नातेवाईक नेहमीच घरी असत. पावसाळ्यात मुंबई कौन्सिलचे अधिवेशन जेव्हा पुण्यास भरे तेव्हा हरी सीताराम दीक्षित, कृष्णराव वागळे आणि इतर कौन्सिल सभासद (बहुतेक नेमस्त गटापैकी ) आपट्यांच्याकडे उतरत. टिळकांच्या घराप्रमाणे त्याखालोखाल म्हणा आपट्यांचे घर या रीतीने राजकारण्याचे दुसरे केंद्र होते.

घरकाम करणाऱ्यांशी आणि आनंदाश्रमात त्यांच्या हाताखाली काम करणाऱ्यांशी त्यांचे संबंध अत्यंत जिव्हाळयाचे होते. श्री. रामसिंग हा आनंदाश्रमात मोठ्या विश्वासूपणे आणि निष्ठेने काम करणारा होता. आपटे सर्वच सेवकांच्या गरजांकडे जातीने लक्ष देत आणि त्यापैकी कुणी जर आजारी पडले तर औषधोपचारही करीत. प्लेगाच्या भयानक साथीत त्यांनी जे मानवहितैषी कार्य केले त्याची प्रशंसा समाज आणि सरकार या दोघांच्याकडून झाली. वैयक्तिक संकटातही त्यांनी आपले कार्य सोडले नाही.

आनंदाश्रमात सर्व प्रकारचे स्वामी आणि संन्याशी येत आणि स्वीकृत कार्याला जागून आपटे आणि त्यांची पत्नी ही दोघेही त्यांचा सन्मान करण्यासाठी आवश्यक ते सर्वकाही करीत, परंतु त्यांतील सर्वच काही स्थिर वृत्तीचे आणि स्वभावाचे नसत. काही वेळा एखाद्या संन्याशाने अंधारातच भोजन करण्याची शपथ घेतलेली असे, आणि तेही प्रत्येक घास यजमानाने आणि यजमानिणीने त्याच्या हातावर ठेवावा लागे, तर काहींना शूद्राचे दर्शनही वर्ज्य असे; आणि अशावेळी त्यांच्यापुढे मोठी समस्या निर्माण होई; आणि ती जितक्या समजूतदारपणे सोडवणे शक्य असेल तितक्या समजूतदारपणे सोडविण्याची ती दोघेही शिकस्त करीत. काही खोटे संन्याशीही काही वेळा येत. एका स्वामीने तर आपट्यांच्या वडिलांवर एवढी मोहिनी घातली होती की ते सर्वसंग परित्याग करून त्याच्या मागे निघाले होते, अशी एक मजेशीर गोष्ट घडली होती.जेव्हा आपट्यांचे मेहुणे जेवण्यास आले तेव्हा त्यांची भोंदूगिरी उजेडात आली, त्या स्वामीचे म्हणणे असे की, प्रत्येकाने त्यांच्यानंतरच भोजन केले पाहिजे आणि ध्यानधारणेच्या नाटकाने ते साऱ्यांना खोळंबून ठेवीत. त्या दिवशी जेव्हा स्वामींना फ़ारच उशीर झाला तेव्हा आपटे पती-पत्नी त्यांना बोलवायला म्हणून गेले आणि दरवाजा उघडण्याआधी त्यांनी सहज आत डोकावून पाहिले तो काय? स्वामीमहाराज चक्क मिठाई खातांना दिसले. ही गोष्ट

उघडकीला येताच स्वामी महाराजांनी कुणाला नकळत चंबूगवाळे आवळले आणि ते पसार झाले. आणि भोळ्या श्रद्धेतून आणि संन्यासातून आपट्यांचे वडील बचावले. आपल्या नेम नियमांना जागणारे संन्यासीही येत आणि ते खरोखरीच काही गोष्टी निशिद्ध मानीत. तसेच ते अनेक शास्त्रात पारंगतही असत, आणि अशांचे स्वागत करण्यात, त्यांच्यापासून काही शिकण्यात आणि त्यांची विद्वत् संगती साधण्यात आपट्यांना आनंदही होत असे. अशा विद्वानांच्या संगतीचा ते आनंदही लुटीत.

आपट्यांनी हिंदुस्थानात खूप प्रवास केला होता आणि त्याच्या इतिहासाच्या, शिल्पशास्त्राच्या, धार्मिक संस्कृतीच्या वारसाचा आणि त्याच्या सृष्टीसौंदर्याचा आणि संमृद्ध साहित्याचा त्यांना अभिमान होता. त्याच्या भवितव्याबद्दल त्यांना मोठा विश्वास होता, आणि जरी आनंदाश्रमाची त्यांनी जी गंभीर आणि महत्त्वपूर्ण जबाबदारी घेतलेली होती, त्या जबाबदारीमुळे राजकारण जरी पेशा म्हणून त्यांना पत्करता येत नव्हते, तरी या देशाच्या उद्धारासाठी झटणाऱ्या विविध क्षेत्रातील पुढाऱ्यांबद्दल त्यांना मोठा आदर होता. लोकमान्य टिळकांना तर ते फार मानीत.

आपट्यांना मुलांची फार आवड होती, आणि ते आपल्या मुलीच्या समवेत त्यांच्यात रोज काही वेळ रमत, त्यांना गमतीदार गोष्टी सांगत, त्यांची विविध प्रकारे करमणूक करीत आणि ते त्या वेळी त्यांच्यातलेच होत. एकदा एका पाळलेल्या माकडाने अचानकपणे खेळत असणाऱ्या मुलांच्यापैकी एकाचा सदरा फाडला. त्या मुलालाही त्यात मोठी गंमत वाटली आणि जेव्हा तो घरी परतला आणि त्याचा सदरा कसा फाटला हे त्याला विचारले गेले तेव्हा आपण आपल्या मित्राच्या घरी खेळायला गेलेलो असतांना तो फाटला असे त्यांने सांगितले अधिक चौकशी करता त्या मुलाच्या पालकांना कळले की त्याचे ते मित्र म्हणजे दुसरे-तिसरे कोणी नसून ते आनंदाश्रमाचे विद्वान आणि प्रख्यात लेखक हरी नारायण आपटे हे होते.

आपट्यांच्याकडे पाळीव प्राणी पुष्कळ होते. कुत्री, एक हरीण, पोपट, मैना, आणि काकाकुवा यांचा समावेश होता. शेवटचा पक्षी तर आपट्यांची इतकी हुबेहुब नक्कल करी की अनेक वेळा आपट्यांनी बोलावले म्हणून नोकर धावत येत आणि मालक नसून तो पक्षीच मालकाची नक्कल करीत असल्याचे त्यांच्या लक्षात येई.

१९०३ ते १९१३ हा आनंदाश्रमातील त्यांचा काळ मोठ्या आनंदाचा, वैभवाचा आणि कीर्तिचा होता. १९१२ सालच्या अकोला येथील मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष म्हणून ते निवडले गेले, मुंबई विद्यापिठाकडून एम्.ए. परीक्षेचे एक परीक्षक म्हणून निमंत्रिले गेले; आणि नंतर व्युइल्सन फायलॉलॉजिक व्याख्यानमालेचे व्याख्याते म्हणूनही ते निमंत्रिले गेले.

# सामाजिक आणि राजकीय कार्य

एक प्रख्यात साहित्यिक म्हणून आपट्यांची प्रतिमा अनेकांना माहीत आहे. पण एक सामाजिक आणि राजकीय कार्यकर्ते म्हणून त्यांनी केलेले कार्यही तितकेच महत्त्वाचे आहे. लोकमान्य टिळकांच्या सारख्या महान पुढाऱ्यामुळे त्यांचे या क्षेत्रातील कार्य त्या काळी मागे पडले. आपट्यांचे लोकावरचे प्रेम, त्यांची विशाल मानवतावादी दृष्टी, त्यांचा स्वार्थत्याग, या साऱ्या गुणांच्या बरोबरीने लोकांच्याबद्दल सहानुभूती आणि त्यांना मदत करण्याची इच्छाही त्यांच्यात होती. सामाजिक कार्य करतांना ज्यांना कौटुंबिक जबाबदाऱ्यांकडे दुर्लक्ष करावे लागले आणि परिणामतः दारिद्र भोगावे लागले. त्यांच्या मानाने आपटे सुस्थितीत होते आणि म्हणून त्याबाबत भाग्यवानही होते. महाराष्ट्रात अद्यापपावेतो अशी एक चमत्कारिक भावना प्रचलित आहे की, सामाजिक कार्यकर्ता हा जितका अधिक गरीब आणि अडचणीच्या परिस्थितीत असेल तितका तो मोठा समजला जातो. द्रारिद्र आणि श्रेष्ठत्व यांचे हे समीकरण मोठे विचित्र म्हटले पाहिजे. आपटे मोठे श्रीमंत नव्हते, पण लोकांच्या साठी काम करण्यापुरते सुस्थितीत होते. वेळ पडल्यास स्वतःचे मत बाजूस ठेवूनही चांगल्या कार्यास ते मदत करीत. या आधी उल्लेखिल्याप्रमाणे पुण्यात न्यू इंग्लिश स्कूल काढणाऱ्या विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्याबद्दल त्यांना फार मोठा आदर होता. चिपळूणकर हे सामाजिक कार्यकर्ते म्हणून फार मोठे होते आणि शैक्षणिक आणि सामाजिक क्षेत्रातील त्यांच्या कार्याबद्दल महाराष्ट्र त्यांचा ऋणी आहे. चांगल्या पगाराची नोकरी सोडून त्यांनी या शाळेची स्थापना केली. त्यातूनच पुढे फर्ग्युसन कॉलेज निघाले. लोकमतप्रतिपादनार्थ त्यांनी मराठीत 'केसरी' आणि इंग्रजीत 'मराठा' ही दोन पत्रे काढली. आदर्श पाठ्यपुस्तके आणि श्रेष्ठ भारतीयांची शिळाछापावरील चित्रे छापण्यासाठी त्यांनी एक छापखाना काढला. प्राचीन ऐतिहासिक पोवाडे, पुस्तके आणि कागदपत्रे यांच्या प्रसिध्दीला त्यांनी चालना दिली. सरकारी नोकरीचा राजीनामा देऊन त्यांनी ब्रिट्रिश सरकारच्या दास्याच्या रूपेरी शृखंला आधीच तोडल्या होत्या. पण त्यांचे श्रेष्ठतम कार्य कोणते असेल तर ते म्हणजे 'निंबधमाला'. या आपल्या नियतकालिकातून आपल्या

स्फूर्तिप्रद लेखांनी देशाच्या स्वांतत्र्यासाठी आपण लढलो आहोत आणि आताही लढू शकतो ही श्रध्दा लोकांच्या मनात वाढवण्याचे कार्य तिने केले. चिपळूणकर १८८२ साली वारले. आपट्यांनी आता लोकशिक्षणाचे कार्य हाती घेण्याचे ठरविले. समान विचारांचे मित्र त्यांनी जमा केले आणि त्या सार्‍यांनी मिळून 'नूतन मराठी विद्यालय' नावाची आणखी एक शाळा १८८२ साली काढली. या शाळेत त्यांनी शिक्षक म्हणून, पण विनावेतन साधारण पाच वर्षेपर्यंत काम केले. आपल्या विषयात नैपुण्य आणि कामावर प्रेम असणारे असे ते उत्कृष्ट शिक्षक होते. पुण्यातील सरकारी अधिकार्‍यांच्या ओळखीमुळे ते अनेक शासकीय आणि आर्थिक अडचणी दूर करून शाळेला मदत करीत. त्यांच्याच प्रयत्नामुळे मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड नॉर्थकोट यांनी नूतन मराठी विद्यालयाला अनुदान देण्याची शिफारस केली. या शाळेचीच प्रगती कॉलेज काढण्यापर्यंत झाली. त्याचे नाव न्यू पूना कॉलेज असे होते आणि ते मुंबई विद्यापीठाला जोडले होते. आपटे आपल्या मृत्यूपर्यंत या कॉलेजच्या नियामक मंडळावर होते आणि याच कॉलेजला त्यांनी संस्कृत, इंग्रजी, फ्रेंच आणि अन्य पुस्तकांचे ग्रंथालय देणगी म्हणून दिले.

आपटे आपल्या तरुणपणीच न्या. मू. रानडे या थोर गृहस्थांच्या प्रभावाखाली आले आणि त्यामुळेच राजकारणात त्यांची मते नेमस्त बनली. श्रेष्ठ सामाजिक सुधारक श्री. आगरकर यांच्याशीही त्यांचे संबंध जिव्हाळ्यांचे होते. त्यांनी 'केसरी' सोडून 'सुधारक' हे पत्र काढले होते. गोखलेही त्यांचे जवळच्या स्नेह्यापैकी एक होते. 'संमतिवयाच्या कायद्याच्या दिवसापासून त्यांची सामाजिक आणि राजकीय क्षेत्रात प्रवेश केला होता. मुलीच्या विवाहाची वयोमर्यादा वाढवण्याला सरकारला भाग पाडावे असा समाजसुधारकांचा प्रयत्न होता तर सनातन्यांचा या कायद्याला विरोधच होता असे नव्हे तर त्यांनी त्याचा धिःकार केला. एका सार्वजनिक सभेत आपटे आणि त्यांचे मित्र यांनी मुलीच्या विवाहाच्या वयोमर्यादेसारख्या धार्मिक रूढीत परकीय ब्रिटीश सरकारला फेरफार करण्याचा हक्क नाही या सनातनी मंडळीच्या दाव्यात आपला निषेध नोंदवला होता. पुढे काही दिवसांनी सुधारणावाद्यांनी दुसरी एक सभा घेऊन अशा प्रकारचा कायदा सरकारने करावा असे आपले मत मांडले. या सभेत सनातन्यांकडून दगडफेक झाली आणि आपटे आणि इतर काही प्रमुख व्यक्ती जखमी झाली. पण ही घटना सामाजिक सुधारणावाद्यांनी आपले मत बळकट करण्यालाच कारण झाली; आणि तिच्यातूनच 'मित्रमंडळ' नावाचा क्लब निघाला. या क्लबात सामाजिक आणि राजकीय स्वरूपाचे अनेक विषय चर्चिले जात आणि एकूण सार्वजनिक कार्याची दिशा ठरे. भांडारकर (थोर संस्कृत पंडित) आणि न्या. मू. रानडे यांची या क्लबाला सक्रीय सहानुभूती होती. नंतर मुंबईचे न्या. मू. तेलंग हेही त्यांना मिळाले.

आपट्यांना 'सुधारका'चे संपादक करावे असा विचार एके वेळी आगरकरांनी केला होता. पण आनंदाश्रमातील जबाबदारीचा आपट्यावरील बोजा आणि करमणूक या साप्ताहिकाची पूर्व प्रायोजित कामे यांचा विचार करून त्यांनी सीतारामपंत देवधर यांना संपादक केले.१९१२ साली जेव्हा सुधारक बंद होण्याच्या मार्गाला लागले तेव्हा काही महिने आपट्यांनी ते चालवण्यास मदत केली.

१८९५ साली इंडियन नॅशनल कॉंग्रेसमधील जहाल आणि मवाळ हे दोन्ही पक्ष परस्परांपुढे दंड ठोकून उभे राहिले आणि ज्याप्रमाणे या आधीच्या अधिवेशनात याच एका मांडवात सामाजिक परिषदही भरली होती तशी आताही भरली तर मंडपाला आग लावू अशी धमकी जहाल पक्षीयांनी दिली.

कॉंग्रेसच्या या अधिवेशनाच्या वेळी 'कॉंग्रेस समाचार' नावाचे वर्तमानपत्र आपटे संपादीत असत, आणि ते कॉंग्रेसच्या अधिवेशनाच्या यशासाठी मनःपूर्वक काम करीत होते.

कॉंग्रेसमधील जहाल मताच्या लोकांचे पुढारी लोकमान्य टिळक यांनी जेव्हा पुण्याची सार्वजनिक सभा जिंकली तेव्हा न्या.मू.रानड्यांनी एक प्रतिस्पर्धी सामाजिक संस्था सुरू केली. या वेळी गोखले लंडनमध्ये असल्यामुळे आपट्यांना संयुक्त चिटणीस म्हणून नेमले गेले. या कामामुळे ते रानड्यांच्या अधिक निकट सहवासात आले.रानड्यांनी त्यांच्याकडे १८९६ साली महाराष्ट्रात जो दुष्काळ पडला होता तेव्हा शेतकऱ्यांची परिस्थिती कशी होती यासंबंधीची आकडेवारी जमा करण्याची कामगिरी सोपवली. यासंबंधीचा आपट्यांचा अहवाल खूपच प्रशंसिला गेला.

गोखले लंडनमध्ये असताना १८९७ साली प्लेगची साथ पसरली. ही साथ आटोक्यात आणण्यासाठी ब्रिटिश सरकारला लागण झालेल्यांना वस्तीपासून दूर ठेवणे वा अन्य अशा उपायांचा अवलंब करावयाचा होता. हे काम सरकारने पुण्यातील लष्करावर सोपविले. ब्रिटिश सैनिकांनी अनेक अघोर कृत्ये केली आणि त्यांनी वापरलेल्या उपायांच्या अनैतिकतेमुळे, क्रूरतेमुळे आणि रासवटपणामुळे पुण्यातील जनतेत क्रोधाची लाट उसळली. लोकांचा संताप एवढा वाढला की असहाय आणि अजाण स्त्रियांच्यावर इंग्लिश सैनिकांनी केलेल्या अत्याचारविरूध्द अनेक पुढाऱ्यांना जाहीर पत्रके काढावी लागली. गोखल्यांना ही बातमी आपट्यांच्यासह इतर अनेकांनी कळविली. मुंबई सरकारने या बाबत कानावर हात ठेवण्याचे विरोधी डेक्कन सभेकडून लंडनमधील सेक्रेटरी ऑफ स्टेट फॉर इंडिया याला पत्रे पाठविली गेली. गोखले परत आल्यावर त्यांना देण्यासाठी टिळकांनीही अत्याचाराचे पुरावे गोळा केले होते. ते मुंबईला गोखल्यांना भेटाण्यासाठी गेले. पण तेथेच त्यांना अटक झाली. स्वतःची अब्रू

वाचवण्यासाठी सरकारकडून ते पुरावे जाळले गेले. त्यामुळे पुरावे सादर करणे शक्य न झाल्याने रानडयांच्या सूचनेवरून गोखल्यांनी ब्रिटिश सरकारपुढे माफी मागितली. जहालाच्यांकडून गोखल्यांच्यावर टीकेची झोड उठली आणि गोखल्यांच्या मनालाही ते फार लागले. गोखल्यांच्या या पाणउताऱ्याला आपणच कारण झालो अशी आपट्यांची भावना झाली. आणि दोन वर्षानंतर गोखले परत येताच आपट्यांनी आपल्याकडचे चिटणीसपद त्यांना दिले.

पुण्याचे प्रमुख नागरिक लिबरल युनियनमध्ये जेव्हा दैनंदिन राजकारणांवर चर्चा करीत तेव्हा आपटेही हजर राहत. न्या. मू. रानडेही पुण्याला मुक्काम असताना त्यात भाग घेत. या चर्चातूनच गोखल्यांना भारत सेवक समाजाच्या स्थापनेची प्रेरणा मिळाली होती आणि त्यांनी ती संस्था स्थापिली. या उदारमतवादी संस्थेचे रूप मेसॉनिक लॉजच्या रूपासारखे ठरवले गेले. 'करमणुकीच्या' जोडीला १८८४ ते १८९४ पर्यंत आपट्यांनी 'ज्ञानप्रकाश' या पुण्याचा दैनिकाचे संपादन केले. त्यावेळी हे पत्र इंग्रजी आणि मराठी अशा दोन्ही भाषात निघे. १८९४ साली ते मद्रास कॉंग्रेसला हजर राहिले आणि सिलोनलाही त्यांनी भेट दिली. १९०६ साली भारत सेवक समाजांकडून ते पत्र घेतले जाईपर्यंत आपटे ज्ञानप्रकाशच्या कचेरीवर देखरेख करीत. आणि त्यासाठी त्यांनी कधीही पगार घेतला नाही.

प्लेगमुळे उजाड आणि उध्वस्त झालेल्या पुण्यातील आपट्यांचे सामाजिक कार्य त्यांच्या निःस्वार्थीपणामुळे आणि बेडरपणामुळे संस्मरणीय बनले. ही साथ आटोक्याबाहेरची होती आणि मृत्यूसंख्याही फार मोठी होती. प्लेगची साथ प्रथम मुंबईत उद्भवली आणि तेथून ती महाराष्ट्र आणि गुजरात येथे मुंबईहून येणाऱ्या प्रवाश्यांच्यामुळे पसरली. मृतांच्या विल्हेवाटीसाठी आपटे स्वतःहून पुढे आले आणि आपल्या मदतीसाठी त्यांनी चार नोकर ठेवले. लोकमान्य टिळकांच्या पुढाकाराने निघालेल्या दवाखान्यात ते अविश्रांत काम करीत. या दुःखद काळात त्यांनी अनेक मित्रांची सेवा केली. या काळात ते संध्याकाळलाच घरी येत. आनंदाश्रमात सर्व दुःखीकष्टी लोकांना समानतेने वागवले जाई. अनेक कुटुंबानी गाव सोडताना आपल्याकडचे दागदागिने तेथे ठेवायला दिले. त्यांचे स्नेही माधवराव जोशी याच साथीला बळी पडले. आपटे त्यांच्या शुश्रुषेसाठी सतत त्यांच्याजवळ होते. आपट्यांच्या मानवतावादी कार्याची दखल मुंबई सरकारने तात्काळ घेतली आणि त्यांच्या गौरवार्थ "कैसर-इ-हिंद" हे पदक त्यांना दिले. या संकटकाळी आनंदाश्रम हे एक अनाथालय बनले होते. पण ही स्थिती फार काळ चालू राहणारी नव्हती; आणि म्हणून आपटे आणि त्यांचे मित्र मिळून या साथीत सापडलेल्यांच्यासाठी त्यांनी एक खास अनाथालय स्थापिले. आपटे आणि एल. आर. गोखले हे अनेक वर्षे या अनाथालयाचे संयुक्त चिटणीस होते.

१९०० साली सरकारने पुणे नगरपालिकेत आपट्यांचा नियुक्त सभासद म्हणून नेमणूक केली.तेव्हापासून आपट्यांनी पुणे नगरपालिकेत अनेक प्रकारची कामे केली.पण निवडणुकीचे तंत्र त्यांना कधी अवगत झाले नाही.आणि त्यांच्या नगरसेवक म्हणून असणाऱ्या कारकीर्दीच्या अखेरीस ते अध्यक्षीय निवडणुकीत हरले. तथापि त्यांनी तेथे फार मोठे काम केले. सर एम. विश्वेश्वरैया आणि जी.के.गोखले अशा प्रख्यात नियुक्त सभासदांच्या बरोबर त्यांनी काम केले. पुण्याच्या गचाळ गटारपध्दतीत त्यांनी सुधारणा करण्यास मदत केली. पुणे नगरपालिकेच्या शिक्षण मंडळावर त्यांनी तेरा वर्षे काम केले. (त्यापैकी सहा वर्षे ते अध्यक्ष होते.) पुराणवस्तूभांडाराची पुनर्रचना केली, किंग एडवर्ड मेमोरिअल हॉस्पिटल सूरू केले, आळंदी देवस्थानाच्या कार्यकारी समितीवर एक सभासद म्हणून काम केले, डफरिन फंड जमवण्यास मदत केली ( त्यातूनच हिंदी परिचारिका तयार करण्यास मदत केली.) इन्फ्लुएंझा हॉस्पिटल काढले आणि त्यात काम केले.(१९१८ च्यां साथीत) आणि अशीच सार्वजनिक हिताची त्यांनी इतकी कामे केली की त्या साऱ्यांचा उल्लेख या छोट्या हकीकतीत देणे शक्य नाही. ते एक फार मोठे नगर पुढारी होते, खरे मानवतावादी होते आणि मोठ्या धैर्याचे आणि सचोटीचे कर्तव्यदक्ष सामाजिक कार्यकर्ते होते.

इंडियन नॅशनल काँग्रेसचे प्रांतिक अधिवेशन १९१५ साली पुण्यात भरवावे अशी कल्पना त्यांनीच प्रथम दिली. ते स्वागत समितीचे अध्यक्ष म्हणून निवडले गेले. १९०७ साली सुरतेला अधिवेशन उधळल्यापासून भारतीय नेमस्तांची प्रांतिक परिषद भरलेली नव्हती. मध्यंतरी गोखले निवर्तले होते आणि दादाभाई नौरोजी आणि सर फिरोजशहा मेहता हे प्रकृतिअस्वास्थामुळे सक्रीय भाग घेण्यास असमर्थ होते.श्री.हो मुसिजी वाडिया आणि मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड विलिंग्डन हे अधिवेशनास हजर होते. अन्य जी प्रख्यात मंडळी हजर होती त्यात महात्मा गांधी, सर नारायण चंदावरकर, सर लल्लुभाई समळदास, श्री.समर्थ, श्री.रँग्लर परांजपे, मो. आर. जी. भांडारकर इत्यादींचा समावेश होता. आपटे इंडियन नॅशनल काँग्रेसच्या सर्व अधिवेशनांना प्रतिनिधी म्हणून वा प्रेक्षक म्हणून हजर असत.या अधिवेशनात स्त्रियांनी अधिक भाग घ्यावा म्हणून ते त्यांची मने वळवण्याचा प्रयत्न करीत आणि स्वतः सौ. काशीबाई कानिटकरांच्या सारख्या स्त्रियांना त्यांनी प्रतिनिधी करून घेतले होते. त्यावेळी ज्या काही प्रकारचे राजकीय कार्य होई त्यात ते पडद्यामागे खूप काम करीत.महाराष्ट्रात आपल्या कल्पना अंमलात आणण्यास आणि त्यांच्या प्रसार करण्यात त्यांचा भाग मोठा होता.

आपट्यांचा भारतीय सामाजिक परिषदेलाही मोठा पाठिंबा होता आणि तिच्या बहुतेक अधिवेशनांना ते हजर होते. परंतु आनंदाश्रमाच्या कामाचा भार आणि त्याच्या उद्दिष्टामुळे त्यांच्या कार्यावर पडणारी मुरड यामुळे सामाजिक परिषदेच्या ध्येयधोरणासाठी त्यांना सक्रीय

भाग घेणे शक्य नव्हते. तथापि, आपली व्याख्याने आणि आपल्या सामाजिक कादंबऱ्या यांच्या द्वारा ते सामाजिक सुधारणांचा लोकप्रिय होईल असा पुरस्कार करण्याची पराकाष्ठा करीत. त्यांच्या सारख्या मागे राहून कार्य करणाऱ्यांच्या प्रयत्नामुळे याबाबतीत महाराष्ट्र फार पुढारलेला होता. पुण्यातील "हायस्कूल फॉर इंडियन गर्ल्सच्या" (काही ऐतिहासिक संबंधामुळे "हुजुर पागा" म्हणून ओळखिली जाणारी शाळा) कॉन्सिलवर त्यांनी अनेक वर्षे काम केले.

मराठी साहित्य परिषदेशीही त्यांचा घनिष्ठ संबंध होता आणि ते तिच्या सर्व अधिवेशनांना हजर राहात. १९१२ च्या अकोला संमेलनाचे तर ते नियुक्त अध्यक्षच होते.

प्रांताप्रांतात सांमजस्य वाढावे म्हणून ते स्थापन झालेली राष्ट्रीय भारतीय मंडळ आणि अन्य अनेक संस्था यांत त्यांनी सामाजिक सेवावृत्तीने सतत केलेल्या कामाचा ताळेबंद येथे देणे कठीण आहे, तरीही रॉयल एशियाटिक सोसायटीची मुंबई शाखा आणि मुंबई विद्यापीठ यांच्याशी असणाऱ्या त्यांच्या संबंधाचा उल्लेख जाताजाता तरी केलाच पाहिजे. पूना टेंपरंस असोसिएशनशी असणाऱ्या त्यांच्या संबंधाचाही उल्लेख करणे आवश्यक आहे.

स्वभावाने आपटे अत्यंत मनमिळावू वृत्तीचे होते आणि त्यांचे मित्रमंडळही मोठे होते. मित्रांच्यासाठी काहीही करण्याचा फार मोठा गुण त्यांच्यापाशी होता आणि ते मित्रांच्या बारीकसारीक गुणांचेही कौतुक करीत. त्यामुळे त्यांच्या मित्रमंडळीत कितीतरी थरांचे लोक असत. काही कॉलेजच्या वेळेपासूनचे मित्र होते तर काही एकमेकांशी गप्पा, टप्पा, विनोद यासाठी तर काही परस्परांचे विनोदी व काव्यमय लेखन वाचून त्यांच्या आनंदासाठी जमत. या त्यांच्या मंडळाला 'लोकप्रिय मंडळ' म्हणत. या मंडळात आपटे आणि समर्थ यांनी नवीन पुस्तके वाचण्यात आणि त्यावर चर्चा करण्यात रात्रीच्या रात्री घालवाव्यात. त्यांचे दुसरे एक मित्रमंडळ होते ते रावसाहेब कानिटकरांच्या घरी जमणारे, केवळ वाङमयीन चर्चा एवढाच त्याचा उद्देश असे. कानिटकर, रानडे (ज्ञानचक्षूचे संपादक), ठाकूर आणि आपटे हे त्या मंडळाचे सभासद होते. या मित्रमंडळाच्या चर्चेतूनच 'मनोरंजन' या मासिकाची कल्पना निघाली. त्यांचे आणि एक मित्रमंडळ होते ते विष्णुशास्त्री चिपळूणकरांची स्मृती जागवणाऱ्याचे.

आनंदाश्रम हे आपट्यांचे निवासस्थान म्हणजे त्यांच्या मित्रांचे आकर्षण स्थान होते. ते शहराच्या मध्यवस्तीत होते आणि येण्याला सर्वांना सोईस्करही होते. ही सर्व मित्रमंडळी तेथे एकदा तरी जमत आणि गंभीर वाङमयीन चर्चा हा त्यांचा रोजचा कार्यक्रम असे. मे महिन्यात कानिटकर मंडळीही त्या मंडळीत जमत. जी मंडळी येथे जमत ती समान राजकीय आणि सामाजिक विचारांची असत. आपटे आपुलकीने आतिथ्य करणारे होतेच. पण ही मंडळी एकमेकांच्या घरी जाऊन तेथेही समान रुचींच्या विचारांवर चर्चा करीत. माधवराव जोशी यांचे

घरही असेच दुसरे घर होते. तिथे पर्वती मंदिरापर्यंत सकाळच्या फिरण्यास गेलेले परततांना त्यांच्याकडे चहासाठी म्हणून जमत. त्या काळी धार्मिक शुध्दीच्या कडक कल्पनांच्यामुळे दुकानातून आणलेली पाव-बिस्किटे खाण्याबद्दल सनातनी लोक नापसंती दर्शवीत. पण जोश्यांच्या घरी चहाबरोबर ही निशिध्द पाव-बिस्किटे खाऊन फस्त करीत. पुण्याच्या कँपात ही पाव-बिस्किटे पुरवणारे एक दुकान होते.

एकदा या चहापानास प्रो. पानसे गैरहजर असतांना मोठी मजेशीर घटना घडली. आपट्यांनी पानश्यांना पुढीलप्रमाणे एक सांकेतिक चिठ्ठी पाठवली. सूज्ञ दीक्षित मठाचे स्वामी माधवरावांच्याकडे आलेले आहेत. बटूही आलेला आहे. इतर सर्व मंडळीही आलेली आहेत. तेव्हा स्वामीची भेट घेण्यास आणि त्याचे तीर्थ प्राशनास तुम्ही येण्याची कृपा करावी. (येथे 'स्वामी' आणि 'बटू' हे पाव आणि बिस्किटे यांच्यासाठी सांकेतिक शब्द होते. पानश्यांच्या घरी ही चिठ्ठी त्यांच्या वडिलांच्या हाती पडली. आता आपल्याला स्वामींचे पवित्र दर्शन मिळेल या कल्पनेने त्यांना मोठा आनंद झाला. स्नान करून ते निघण्यास तयार झाले आणि आपला मुलगा घरी येताच त्यांना सांगितले की, आपल्यासारख्या खेड्यातल्या माणसाला ही केवढी मोठी दुर्लभ संधी आलेली आहे, तेव्हा चल आपण जाऊया. प्रो. पानसे मोठ्या पेचात सापडले. पण मोठ्या समयसूचकतेने त्यांनी आपल्या वडिलांना सांगितले की मी आधी जाऊन भेटण्याची वेळ नक्की ठरवून येतो. पानसे आले आणि तो सांकेतिक निरोप धार्मिक वृत्तीच्या वडिलांनी कसा खरा मानला हे सांगितले. पानश्यांच्या या अडचणीवर सर्वजण खूप हसले. पानश्यांनी परत येऊन वडिलांना सांगितले की स्वामी फार थोडा वेळ तिथे होते आणि आता तर परतही गेले आहेत. आता यापुढील अशा भेटीसाठी त्यांना थोडे थांबावे लागेल. तो वृध्द धार्मिक माणूस फार कष्टी झाला आणि त्या तथाकथित स्वामींची भेट न झाल्यामुळे स्वतःला दुर्दैवी समजला.

या प्रसंगाने त्या काळच्या प्रतिष्ठित गृहस्थांच्या मनावर धार्मिक रूढींची किती कडक बंधने होती हे स्पष्ट होते. गोखले हे आपट्यांचे त्यांच्याहून दोन वर्षांनी लहान असणारे असे थोर स्नेही होते. न्या. मू. रानडे यांचे चहाते आणि मदतनीस या नात्यांनी हे दोघे जवळ आले. गोखले जरी अन्य स्नेह्यांच्या घरी जात नसले तरी नियमितपणे आनंदाश्रमात येत असत. समान राजकीय दृष्टिकोण हा त्यांना एकत्र आणणारा दुवा होता. आपट्यांनी इंडियन नॅशनल कॉंग्रेसमधील राजकारणात नेमस्तांची बाजू स्वीकारली होती. म्हणून गोखल्याशी त्यांची मैत्री गाढ होती आणि त्यांच्या संभाषणाचा एक खात्रीलायक पुरावा उपलब्ध आहे की गोखल्यांना मंत्रिमंडळातील एक मंत्री होऊन देशाची सेवा करावयाची होती तर आपट्यांची मनीषा मोठे प्रख्यात कादंबरीकार होण्याची होती.

गोखले आपट्यांच्या बरोबर केवळ नेमस्त राजकारणच बोलत नसत तर अनेक वेळा शेक्सपीअरच्या टीकेसंबंधीही चर्चा करीत असत. आपट्यांचे इंग्रजी, फ्रेंच, संस्कृत वाङ्मयाचे व्यापक वाचन झाले होते आणि ते या चर्चेत महत्त्वाची भर घालीत. फ्रेंचचे प्राध्यापक म्हणून आपट्यांना पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजात घेतले जावे अशी गोखले यांची इच्छा होती, पण ती प्रत्यक्षात येण्याला काही तांत्रिक अडचण आली असावी. मुंबईच्या लेजिस्लेटिव्ह कौन्सिलमध्येही त्यांना निवडून द्यावे असेही त्यांना फार वाटे. १९०९ साली ते निवडणुकीस उभे राहिले. टिळकांचे अनुयायी न. चि. केळकर हेही त्याच जागेसाठी विरोधी उमेदवार म्हणून उभे राहिले. पण ते राजकीय गुन्ह्यासाठी तुरूंगात गेले होते. या केवळ सत्याभासात्मक कारणावरून मुंबई सरकारने त्यांना अपात्र ठरविले. मुद्दामहून केलेल्या या कायदेशीर अन्यायांबद्दल आपट्यांना फार वाईट वाटले. केळकरांचे कट्टर अनुयायी तर याबाबत आपट्यांनाच जबाबदार धरून त्यांना दोष देऊ लागले. पण त्यांना आपट्यांचे राष्ट्रीय उदार मन कळलेच नाही.

वाचकांना गंमतीची वाटेल अशी एक गोष्ट म्हणजे 'मी' कादंबरीत आपट्यांनी भावानंद या पात्राच्या ज्या एका संस्थेचे चित्रण केले होते त्या संस्थेला 'भारत सेवक समाज' या नावाने १९०५ साली गोखल्यांनी मूर्त रूप दिले. गोखले मृत्युशय्येवर असतांना त्यांना भेटणारे अखेरचे स्नेही म्हणजे आपटे. १९ फेब्रु. १९१४ ला गोखल्यांनी त्यांना मुद्दामहून बोलावून घेतले होते. अखेरचे शब्द ते बोलले ते आपट्यांच्या बरोबरच. त्या दोघांत किती आत्मीयता होती हे यावरून स्पष्ट होते.

त्यांच्या आणखी एका स्नेहभावाचे उदाहरण देणे युक्त ठरेल. तो स्नेहभाव चित्रशाळा प्रेसच्या श्री. वासुकाका जोशी यांच्यासंबधीचा आहे. जोशी कट्टर टिळकवादी तर आपटे मवाळ पक्षातले. तरीही आपट्यांनी आपली 'सूर्योदय' ही ऐतिहासिक कादंबरी जोशी यांनाच आपल्या निःस्वार्थ आणि खऱ्या मित्रभावाचे द्योतक म्हणून अर्पण केली.

श्री. हरी महादेव पंडित या नावाचे नागपूरचे त्यांचे आणखी एक मित्र होते. पंडित हे 'देशसेवक' चे संपादक होते. ते एक बुध्दिमान लेखक आणि सामाजिक कार्यकर्ते होते. आपल्या स्नेहाचे प्रतीक म्हणून आपट्यांनी आपली 'मी' ही कादंबरी त्यांना अर्पण केली आहे. सामाजिक सुधारणेच्या कैवाऱ्यात त्यांचे पुष्कळच मित्र होते. मोरोपंत व्ही. जोशी आणि राव बहादुर मुधोळकर (नागपूरचे) आणखी कितीतरी राजकीय कार्यकर्ते आपट्यांचे मित्र होते. गुजरातहून मुंबई लेजिस्लेटिव्ह कौन्सिलवर निवडून आलेले आणि उदार मतवाद्याचे प्रशंसक असणारे एक कॉंग्रेसचे सभासद एच. एस. दीक्षित आपट्यांना भेटत असत आणि पुण्या-मुंबईतील राजकारण आणि सामाजिक सुधारणा याविषयी चर्चा करीत. शिक्षणतज्ज्ञ आणि प्रख्यात

लेखक राव बहादुर विष्णु मोरेश्वर महाजनी हेही त्यांना खूप मानणारे होते. आपट्यांची वाङ्मयीच प्रज्ञा ओळखण्यात ते पाहिले होते आणि ते कटाक्षाने आपट्यांच्या लेखनाचे रसग्रहण करून योग्य त्या सूचनाही देत. त्यांना मान देणारे आणखीही अनेक मित्र होते आणि ते त्यांना वरचेवर भेटतही असत. आपट्यांच्या सामाजिक कार्यामुळेही त्यांना काही फार चांगले मित्र मिळाले. १८९७ साली पुण्यात काळ पसरला तेव्हा राव साहेब व्हि. ए. पटवर्धन आणि आपटे यांनी स्वयंसेवक म्हणून मिळून काम केले. पुणे नगरपालिकेतही ते दोघे डफरिन फंड संस्थेचे संयुक्त चिटणीस म्हणून एकत्र आले आणि पटवर्धन तर आनंदाश्रमाचे अनेक वर्षे एक विश्वस्त होते. हिराबाग अनाथालय आणि पुणे नगरपालिका यांच्या कार्यात एल. आर गोखलेही त्यांचे निकटवर्ती बनले. पुणे नगरपालिकेतील आपट्यांच्या कार्यामुळे राव बहादुर रायनारायला अमरचंद, हणमंतराव, रामनाथ आणि शेट माडविल्ले यांच्यासारखे मित्रही त्यांना मिळाले. ही सर्व मंडळी आनंदाश्रमात वरचेवर येत असत.

आपट्यांच्या जवळच्या संबंधात असणारे असे आणखी एक मित्रमंडळ होते आणि ते पुण्याच्या सरकारी कचेऱ्यातील होते. प्रथम ते रावबहादुर वाड यांच्याकडे जमत पण १८९८ मध्ये प्लेगने झालेल्या त्यांच्या दुःखद निधनानंतर ही मंडळी आनंदाश्रमाकडे वळली.

महाराष्ट्रातील काही छोट्या जहागिरींच्या आणि संस्थानाच्या प्रमुखात आपट्यांच्या अधिक जवळचे जे होते त्यात श्रीमंत काकासाहेब पंत प्रतिनिधी (पूर्वीच्या सातारा जिल्ह्यातील औंध संस्थानाचे) आणि श्रीमंत बाळासाहेब घोरपडे (कोल्हापूर जिल्ह्यातील इचलकरंजीचे) यांचा समावेश होता. पंत प्रतिनिधींनी काढलेली महाभारताची चित्रे पाठसंशोधित महाभारताचे सौंदर्य वाढवीत आहे. पंत प्रतिनिधी कला आणि साहित्य या विषयावर आपट्यांशी चर्चा करीत असत. रामायण आणि महाभारत यावरील चित्रांतील व्यक्तींचे पोषाख आपट्यांनी सुचवलेले होते, आणि स्वतः आपटे या दोन महाकाव्याचे पुण्याच्या एका प्रकाशकासाठी टीकात्मक समालोचन करणार होते. त्या चित्रातील कपड्यांची शैली (त्यात केसही आले), दागिने, केशरचना, हत्यारे आणि शस्त्रात्रे यावर आपट्यांचा या दोन महाकाव्यांच्या सखोल अभ्यासाचा ठसा होता. दुसरे संस्थानिक बाबासाहेब घोरपडे हे सर्व उत्तम वाङ्मयाचे चहाते होते. ते एकदा थट्टेने म्हणाले की महाराष्ट्राची रूढ पूर्वपरंपरा बदलण्याचे मूळ कारण समाजकारण आणि राजकारण यापेक्षा आपट्यांच्या कांदबऱ्यात आंढळते.

आपटे हे राव साहेब गोविंदराव कानिटकर आणि सौ. काशीबाई कानिटकर या दांपत्याचे अत्यंत निकटचे असे स्नेही होते. काशीबाईंना त्यांच्या लेखनासाठी आपट्यांनी कितीतरी प्रकारे उत्तेजन दिलेले होते हे आपण याआधीच पाहिले आहे. ते तिला आपल्या सख्ख्या बहिणीचाच

मान देत. त्या काळी स्त्रियांना शिक्षण घेणे मोठे कठीण होते आणि त्यातही इतरांकडून उत्तेजन मिळणे तर अधिकच कठीण होते. परंतु स्त्रियांना शिक्षण दिले गेले पाहिजे आणि देशाच्या प्रगतीत त्यांनी आपला पूर्ण वाटा उचलावा असे आपट्यांनां वाटे आणि म्हणून ज्या स्त्रियांना शिक्षण द्यावयाचे असे आणि थोडेफार कार्यही करावयाचे असे त्यांना उत्तेजन देण्यास ते नेहमी तयार असत. या त्यांच्या सहानुभूतीपूर्ण वृत्तीमुळेच त्यांचा आणि कानेटकर दांपत्याचा स्नेह वाढला. एकदा असे घडले की जेव्हा काशीबाई कानिटकर त्यांना भेटावयास आल्या तेव्हा ते माडीवर गो. कृ. गोखल्यांशी काही चर्चा करीत होते आणि म्हणून आपट्यांना न भेटताच परतण्याचे काशीताईनीं ठरविले. पण जेव्हा त्या त्यांना भेटावयास खाली थांबल्या आहेत असे त्यांना कळले तेव्हा ते स्वतःच खाली आले, आणि काशीताईंना भेटून त्यांनी दिलगिरी व्यक्त केली. नंतर त्यांनी आपल्या नोकरांना आज्ञाच देऊन ठेवली की त्या जेव्हा येतील तेव्हा ते कसल्याही कामात असले तरी त्यांना भेटावयास पाठवावे. त्यांचे मित्र माधवराव जोशी यांच्या पत्नी पार्वतीबाई जोशी यांच्याबद्दल ही अशीच भूमिका होती. ते तिला आपल्या बहिणीप्रमाणे वागवीत आणि माधवरावांच्या मृत्युनंतर त्यांनी तिची आणि तिच्या मुलांची सतत काळजी घेतली.

श्रीमंती किंवा जीवनातील विवक्षित अवस्था ही आपटे मैत्रीच्या आड कधीच येऊ देत नसत. त्यामुळे गोखले नावाचे एक शिक्षक त्यांचे मित्र होते आणि ते त्यांना अत्यंत आपुलकीने आणि अन्य थोरामोठ्यांच्या प्रमाणे वागवीत. रंगोपंत अत्र्यांच्या बद्दलची त्यांची आस्थाही (हे रंगोपत म्हणजे त्यांच्या एका कॉलेज मित्राचे धाकटे बंधू आणि त्यांना आपल्या भावाप्रमाणेच वागवीन असे त्यांनी आपल्या या कॉलेज मित्राला तो मरणशय्येवर असताना वचन दिलेले होते) कधी कमी झाली नाही. आणि त्यांनी त्यांना जणू आपल्या मृत बंधूप्रमाणेच आस्थेने वागवले.

आपट्यांच्या मित्रमंडळीत पुण्यातील काही इंग्रजी गृहस्थही होते. सर क्लॉड हील्, मि. मौउंटफोर्ड, मि. रार्बट्सन, मि. कीटिंग, आणि मि. किंकेड हे त्यापैकी काही होते. शेवटचे दोघे तर आपट्यांचे विशेष निकटवर्ती होते. आपटे एकदा एक आठवडाभर किंकडचे पाहुणे म्हणून राहिले होते आणि त्यावेळी मराठ्यांचा इतिहास आणि इतर दोघांनाही रस असणाऱ्या विषयावर चर्चा करण्यात त्यांनी आपला वेळ घालविला. मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड विलिंग्टन यांचेही आपटे यांच्याबद्दल फार चांगले मत होते आणि आपटेही आपल्या इंग्रजी मित्रांमार्फत अनेक गोष्टी करून घेत, अनेक अडचणी दूर करीत, आणि लोकांच्या हालअपेष्टा सहज नाहीश्या करीत.

त्यांना मुलांच्याबद्दलही फार प्रेम होते, आणि ते या आपल्या लहान मित्रांशी आनंदाने बोलत आणि त्यांचे बोलणे ऐकत. नेहमीच त्यांच्याशी समरस होत, ते त्याच्यासाठी कविता

लिहीत. अशी एक गोष्ट सांगतात की त्यांनी एका एकदा मुलाला आपल्या घरी जेवावयास बोलावले. मुलगा घरी गेला आणि त्याने आपल्या आई-बाबांना सांगितले की त्याला त्याच्या हरी नावाच्या मित्राच्या घरचे दुसऱ्या दिवासाचे जेवण्याचे आमंत्रण आहे. त्यांचे पालक हा हरी कोण याची जेव्हा चौकशी करू लागले तेव्हा ते आश्चर्याने थक्क झाले की आपला मुलगा आपटे या नावाच्या एका अरण्यात साहित्यिकाचा जिवलग मित्र आहे. अशा प्रकाराचा विश्वास ते मुलांमध्ये निर्माण करीत, त्यांना उत्तेजत देत की त्यामुळे ती मुले त्याच्यापेक्षा ४० वर्षांनी लहान असले तरी ती त्यांच्या संगतीत आनंदाने रमत.

# सुधारक आपटे

महाराष्ट्रात १९ व्या शतकात काही दशके आणि २० व्या शतकाची पहिली दोन दशके ही व्यापक सामाजिक आणि राजकीय उत्क्रांतीने दुमदुमली होती. हिंदू समाज तोवर अज्ञात असणाऱ्या नव्या सामाजिक आणि राजकीय वावटळीत ओढला गेला होता. त्यांच्या चालीरीती आणि जातीरचना यावंर ख्रिस्ती धर्मोपदेशकांडून कडक आणि खरमरीत टीका केली जात होती. सरकारी यंत्रणाही समाजाचा पुरातन पायाच उखडून टाकीत होती. (उदा. मृत्युपत्रान्वये संपत्तीच्या वारश्याबाबतच्या कायदा) हिंदूच्यामधील बुध्दिवादी वर्गाचे जे मार्गदर्शक होते आणि ज्यांनी पश्चिम भारतात उदात्त हेतूने वैचारिक क्रांती करावयास सुरुवात केली ते म्हणजे न्या. मू.रानडे, न्या. मू. तेलंग, प्रख्यात संस्कृत पंडित रामकृष्णपंत भांडारकर, प्राचार्य आगरकर, स्वामी दयानंद सरस्वती आणि ज्योतिबा फुले हे होत. त्यांनी जातीभेद, अस्पृश्यता, स्त्रियांची निरतक्षरता आणि सामाजातील त्यांचे खालचे स्थान यासंबधीचे तत्त्वे आणि आचार यांतील विसंगतीची जाणीव हिंदू समाजाला करून देण्याचा अविरत प्रयत्न केला. दारूच्या व्यसनाची नवीन टूम आणि समाजाच्या वरच्या थरात पुरातन काळापासून चालत आलेली वेश्यागमनवृत्ती यावंर कडक टीका केली गेली. आपटे खंदे स्वदेशाभिमानी आणि कट्टर सामाजिक सुधारणावादी असे दोन्ही असल्याने त्यांच्या जीवनाच्या प्रारंभ काळातच न्या. मू. रानडे यांच्या सान्निध्यात आले या सुधारणांच्या आणि राष्ट्रीय विचारांचा अग्रणींच्या कार्यकर्त्यात सामील झाले. आपल्या समाजात ज्या समस्या आणि दुष्ट रूढी होत्या त्यांची आपल्या कांदबऱ्यात सांगोपांग चर्चा करून त्यांनी सुधारणावादाचा आणि राष्ट्रवादाचा पुरस्कार केला. या समस्याची उत्तरेही देण्याचा त्यांनी प्रयत्न केला.

एकत्र कुटुंबपध्दतीतील दोष, स्त्रियांचे अज्ञान आणि त्यांना शिकवण्याची गरज, बालविवाहसारखे सामाजिक प्रश्न, विषम विवाह, प्रौढ विवाह, विधवांचा पुनर्विवाह, स्त्रियांचे वचन आणि भ्रष्ट स्त्रियांचे पुनर्वसन इत्यादीची चर्चा त्यांच्या कांदबऱ्यात आढळते. आपट्यांनी

आगरकरांच्या प्रमाणे समाजावर कोरडे ओढले नाहीत तर प्रेमळ पत्नीप्रमाणे पात्रांच्या कृतीच्या-द्वारा त्याला उपदेश केला. आता हे मान्य झाले आहे की समाजिक सुधारणांवर त्यांचा प्रभाव निबंधकार लोकहितवादी (गोपाळराव हरी देशमुख) यांची कडक सामाजिक टीका आणि आगरकरांची चावरी लेखणी यांच्या प्रभावापेक्षा अधिक होता. उदा. त्यांच्या 'गणपतराव' या कादंबरीत वैवाहिक जीवनाचा आनंद, बालविवाहाचे दुष्परिणाम, विधवांचा पुनर्विवाह, स्त्री शिक्षण, आणि जाती व अंधश्रध्दा यांचे दुष्परिणाम यांच्यावर भरपूर चर्चा आढळते. त्यांची दुसरी कांदबरी 'पण लक्षात कोण घेतो ? कुटुंबातील परस्पर संबंध , त्या काळची स्त्रियांची स्थिती, एकत्र कुटुंबपध्दती, धर्माच्या चुकीच्या कल्पना, आणि नैतिकतचे ढोंग यांची चर्चा करणे, भंयकर 'दैव्य' आणि 'कर्मयोग' या कादंबऱ्यात विधावाही कशी उत्तम माता होऊ शकतात. (त्या काळच्या विधवांच्या जीवनातील भ्रष्टाचाराच्या कल्पनांच्या विरूध्द) यांची चित्रे आढळतात. आपट्यांचे असेही मत होते की जर विधवांना पुनः विवाह करू दिला जात नसेल तर विधुरांनाही पुनः लग्न करण्याला परवानगी देऊ जाऊ नये. ही त्यांची विचारसरणी तर्कशुध्द होती. तथापि, सर्वसामान्यपणे हे लक्षात घेतले पाहिजे की विवाह ही बहुशः अगदी वैयक्तिक बाब असते आणि कोणताही नियम वा कायदा व्यक्तिगत परिस्थितीत लावता येत नाही. त्यांचा स्वतःचा दुसरा विवाह किंवा न्या. मू. रानडे यांचा द्वितीय विवाह ही या संदर्भात उदाहरणे म्हणून सांगता येतात. आपटे विधवेशी विवाह करू शकले नाहीत. कारण त्यांनी तसे केले असते तर त्यांना कुटुंबातील मंडळीचे संबंध तोडावे लागले असते (कारण ते निश्चितपणे सनातनी होते) इतकेच नव्हे तर त्यांना आनंदाश्रमही सोडावा लागला असता. यातून हे स्पष्ट होते की अगदी साधे आणि बाह्यतः विवेकपूर्ण आणि तर्कशुध्द अनुमानेही सखोल वैयक्तिक आणि भावनात्मक संबंधानी गुंतलेल्या जीवनास हसवता येत नाहीत. संमतिवयाचा कायदा त्या वेळी अगदी कडाक्याने चर्चिला जात होता. आपट्यांच्या या कायद्याला पाठिंबा होता. (कारण) त्यामुळे मुलीचे लग्नाचे वय आठावरून १४ किंवा १६ पर्यंत वाढले असते. जरी आपट्यांचे चुलते या कायद्याच्या विरूध्द होते तरी गोखल्यांच्या बरोबर आपट्यांनीही आपल्या मित्रमंडळीतील सभासदांकडून आपल्या मुलीचे लग्ने १६ व्या वर्षाच्या आधी करणार नाही अशा वचनपत्रावर सह्या करून घेतल्या मुलींच्या विवाहचे वय वाढवण्याची सुधारणावाद्यांची ही मागणी राजकीय स्वरूपाची होती; तर ज्या परकीय सरकारने राज्य जिंकल्यामुळे जे अधिकार आधीच मिळविले होते त्यात या सामाजिक आणि धार्मिक हक्कांची भर पाडण्यास सर्वसामान्य जनतेचा विरोध होता. सरकारने याबाबत कायदा करावा असे सुधारकांचे म्हणणे होते. १८९० साली जे लेखी निवेदन पाठवले त्यावर सुधारणावादी आगरकरांनीदेखील सही केली नाही. पण त्यावर सही करणाऱ्यात लोकमान्य टिळक पहिले

होते आणि त्यात आपट्यांच्यासह आणखी ४० प्रतिष्ठित पुणेकर होते. मोठी गंमतीची गोष्ट म्हणजे या लेखी निवेदनावर सह्या करणाऱ्यात सनातनी आणि सुधारक हे दोघेही होते. आपटे हे विचाराबरोबर वृत्तीनेही सुधारक होते. सामाजिक जीवनाच्या सुमारे पंचेचाळीस वर्षात सामाजिक सुधारणांचे सारे प्रस्ताव त्यांनी पुरस्कारले.तथापि आनंदाश्रम ही एक धार्मिक संस्था असल्यामुळे आनंदाश्रमातील त्यांचे काम विवक्षित पारंपारिक पध्दतीने करावे लागे. आणि म्हणून ते इमानपूर्वक देवपूजा,उत्सव,घरगुती धार्मिक विधी,दर सोमवारचा शिवाचा उपवास, शिवरात्री, आणि इतर किरकोळ विधी करीत असत. त्यामुळे ते सर्वांना प्रिय होते. याचा अर्थ या धर्माचरणाबद्दल त्यांची स्वतःची बुध्दिवादी मते नव्हती असे नव्हे. हे सर्व करताना त्यांच्या चुलत्यांना आई-वडिलांना आणि इतर नातेवाईकांना जे प्रामाणिकपणे चांगले आणि आध्यात्मिक हिताचे वाटे त्याचा ते आदर करीत इतकाच.जरी त्यांची मते सुधारणावादी असली तरी ज्या त्यांच्या चुलत्यांनी आश्रम स्थापन केला होता त्यांना दिलेले वचन त्यांना मोडावयाचे नव्हते. 'कर्मयोग', 'आजच', आणि आणखी काही कादंबऱ्यात त्यांचे हे मत व्यक्त होत आहे. स्वप्न, पुर्नजन्म, आणि दैवी स्फूर्ती यांवर त्यांचा विश्वास होता. कोलरिजने इंग्रजी वाङ्मयात जसे केले तसेच त्यांनीही आपल्या कादंबऱ्यात या सर्व गोष्टीचा उपयोग केलेला आहे. ते देवभक्त होते आणि आपल्या मुलीचे चांगले व्हावे म्हणून त्यांनी अनेक नवस केले आणि ते पारही पाडले. पूजा करताना ते पवित्र रेशमी वस्त्र नेसत ती केवळ रीत म्हणून नव्हे तर त्यात स्वच्छता आणि शुध्दता असते म्हणून. आपल्या कुटुंबातील मंडळीना किंवा सामान्यपणे लोकांना असुखकारक होईल असे वागू नये असे त्यांना वाटे.

ते थिओसोफिस्टांचे कर्मकांड आणि विचार, प्रार्थनासमाजाचे अनुयायी, वारकरी आणि लोकांची फसवणूक करणारे विविध दांभिक गुरू आणि त्याचे शिष्य यांवर टीका करीत असत. त्यांना रामदासांचा दासबोध, तुकारामाचे भक्तिभावपूर्ण अभंग, ज्ञानेश्वरी, भगवद्गीता, उपनिषदे आणि वेद हें ग्रंथ आवडत. त्यांनी ख्रिस्ती धर्म आणि बायबल यांच्यावर त्यातील कर्मठपणासंबंधी टीका केली असली तरी त्यातील सखोल मानवहितैषिकेबद्दल त्यांना आदर होता. 'कर्मयोग' कादंबरीतील चंद्रशेखर हे पात्र त्यांची धार्मिक मते व्यक्त करते असे मानता येते. टेनिसनमध्ये वा अन्य व्हिक्टोरियन कवीत आणि कादंबरीकारात जशी धार्मिक नास्तिकतेची वृत्ती आढळते. तशी वृत्ती त्यांच्याही कांदबऱ्यात काहीं वेळा आढळते. त्यांची याबाबतची मते चंद्रशेखर या पात्रातून व्यक्त होतात कारण तोही जो परमात्मा सर्व आनंदाचा अर्क आहे आणि जो सर्व विश्वावर स्वामित्व गाजवतो त्या सर्व समर्थ आणि सर्वज्ञ परमात्म्यावर श्रध्दा ठेवतो. त्या काळच्या सुशिक्षिताप्रमाणे आपटेही परमेश्वरापर्यंत पोहोचण्याच्या मार्गाबद्दल साशंक असावेत. राजकीय आणि सामाजिक सुधारणा आणि त्यांचे अग्रक्रम

यासबंधीची त्यांची मते शिवरामपंत या पात्रांच्या उद्गारावरून व्यक्त होतात. शिवरामपंताच्याही मताने त्या दोहोत दुजेपणा नाही आणि त्या दोघांनाही देशहिताच्या दृष्टीने समान अग्रक्रम दिला पाहिजे. 'मी' कादंबरीतील भावानंदाच्या मठाच्या कल्पनेतून भारताच्या कल्याणाविषयीच्या आपट्यांच्या कल्पना व्यक्त होतात. त्यातील 'आनंद' शाळेत देशहिताच्या तत्वावर भर दिलेला आहे. "माझ्या देशाचे कल्याण हाच माझा धर्म आणि माझ्या देशाचे स्वातंत्र्य हीच माझी मुक्ती" हे ते तत्त्व होय. गोखल्यांनी स्थापन केलेल्या भारत सेवक समाजाच्या कल्पनांशी या कल्पना मिळत्याजुळत्या आहेत. भारतातील ब्रिटिश राजकारणासंबंधी आपट्यांच्या कल्पना स्पष्ट होत्या आणि त्या 'आजच' मधील संवादातून व्यक्त होतात. तो पोलीस अधिकारी म्हणतो, "तुम्ही तुमच्या संस्था चांगल्या हेतूने काढलेल्या आहेत पण ब्रिटिश सरकार त्याचा वेगळा अर्थ लावल्याशिवाय राहणार नाही आणि तो आमूलाग्र वा ब्रिटिशविरोधी राजकारणी कृती सहन करणार नाही."

१९१३ च्या फेब्रुवारी १९ तारखेस झालेल्या त्यांच्या मुलीच्या मृत्यूने त्यांना जबर धक्का बसला. ते अति निराश झाले आणि आपल्या पत्नीसह काही दिवसांसाठी लोणावळ्यास गेले. या दुःखद हानीमुळे पुण्याप्रमाणेच येथेही अनेकजण येऊन त्यांना भेटत असत. या थंड हवेच्या ठिकाणी ते एक महिनाभर राहिले. त्यांचे दुःख हलके करण्यासाठी त्यांचे वडील तिथे त्यांच्याजवळ राहिले होते. पुण्याला परतल्यानंतर त्यांची पत्नी आजारी पडली. पण सुदैवाने तो केवळ मलेरिया ठरला. आपल्या मुलीच्या मृत्यूमुळे झालेले दुःख इतके जबर होते की अनेक दिवस ते नीट जेवतही नसत. किंबहुना ते तिच्या खोलीत जायलाही धजत नसत. त्यांचे दुःख दीर्घकाल टिकले आणि मुळीच कमी झाले नाही. त्यांच्याजवळ तिचा एक फोटो होता. त्यात तिच्याजवळ तिची एक बाहुली होती आणि त्यावर एक वचनही लिहिलेले होते. ते असे की 'तिच्या करमणुकीसाठी आणि आपल्याही." अत्यंत निराशेने आणि दुःखाने ते त्या फोटोकडे पाहात बसत. एक वर्षपर्यंत ते तिच्या स्मृतीसाठी म्हणून सोमवारी जेवत नसत. या त्यांच्या मनोवृत्तीचा परिणाम त्यांच्या लेखनावर झाला आणि या दुःखद घटनेनंतर लक्षात घेण्याजोगे असे काहीही त्यांच्या लेखणीतून उतरले नाही. ते लिहायला म्हणून बसत पण लेखणीच चालत नसे. त्यांच्या जीवनातला सर्व रस आटला. दुःख आणि निराशा यांनी त्यांचा अंतरात्मा ढवळून निघाला. जेव्हा त्यांची मुलगी वारली तेव्हा त्यांची 'कर्मयोग' कादंबरी 'करमणूक' मधून क्रमशः प्रसिध्द होत होती. पण तीही अपूर्ण राहिली. १५ मार्च १९१३ च्या अंकात त्यांनी "एक स्वप्न" या लेखात आपली मनोव्यथा व्यक्त केली आहे.

१९१४ साली ते एका धार्मिक निधीतून भरणाऱ्या परिषदेसाठी दिल्लीला गेलेले असताना जेव्हा पूर्ण गळाठलेले त्यांच्या पत्नीला दिसले, तेव्हा तिने त्यांना सोमवारी थोडेफार तरी

खाण्याचा आग्रह केला आणि खायला लावले. ते तसेच पुढे आपल्या पत्नीसह हरद्वार, लक्ष्मण झुला, मथुरा, वृदांवन, आग्रा आणि अन्य उत्तर हिंदुस्थानातील स्थळे पाहण्यास गेले आणि त्याद्वारा मनाला दुःखाचा विसर पाडण्याचा त्यांनी प्रयत्न केला. पण त्याचाही काही उपयोग झाला नाही. पुण्याला परतल्यावर ते पुनः आजारी पडले आणि दोन महिने लोणावळ्यास राहण्यास गेले. डॉक्टरांनी निदान केले की त्यांचा आजार हा केवळ उपासमारीचा आहे. १९१४ च्या अखेरीस त्यांचे वडील नानासाहेब आजारी पडले आणि आपटे रोज त्यांची सेवा करू लागले. नानासाहेबांचे दुखणे वाढले आणि १९१५ च्या फेब्रुवारीत ते गेले. त्याच साली आणि त्याच महिन्यात गोखल्यांनी देह ठेवला. आता फेब्रुवारी महिन्याची त्यांनी धास्तीच घेतली. शक्यतो त्यांना माणसात राहावेसे वाटू लागले. आणि म्हणून त्यांनी आपल्या पुतण्याला जवळ राहावयास आणले. त्यांची एक चुलतीही आपल्या मुलाबाळांसह आनंदाश्रमात राहावयास आली: पण नातेवाईकांच्या या संगतीनेही त्यांच्या मनाचे सांत्वन होईना. म्हणून सार्वजनिक कामाकडे अधिक लक्ष द्यावयाचे त्यांनी ठरवले.

वर उल्लेखिल्याप्रमाणे मुंबई प्रांतिक काँग्रेस अधिवेशनाच्या स्वागत समितीचे ते अध्यक्ष निवडले गेले. या कामात त्यांचा काही वेळ गेला. त्याच वर्षाच्या सप्टेंबरात पुणे नगरपालिकेचे ते अध्यक्ष म्हणून निवडले गेले आणि त्यामुळे पुण्याच्या नागरी प्रश्नात त्यांनी आपला बराच वेळ खर्च केला. १९१५ साली मुंबई विद्यापीठाकडून त्यांना विल्सन भाषाशास्त्रीय व्याख्याने देण्याची विनंती करण्यात आली. त्यानुसार त्यांनी प्राकृत भाषांचा विकास, त्यांचा संस्कृत नाटकातील उपयोग, महाराष्ट्रीय प्राकृत आणि मराठी यांचे नाते आणि नंतर ज्ञानेश्वरपूर्व वाङ्मय आणि ज्ञानेश्वरीनंतर मराठी वाङ्मय या विषयांवर तीन व्याख्याने दिली. या व्याख्यांनाचे स्वरूप सामान्यपणे सर्वसामान्यांना कळेल असे असल्याने आधुनिक भाषाशास्त्रज्ञाना दृष्टीने ती तितकीशी समाधानकारक नव्हती.

१९१६ च्या २१ आक्टोबर रोजी प्रांतिक काँग्रेस परिषदेचे अधिवेशन अहमदाबाद येथे श्री. जिनांच्या अध्यक्षतेखाली भरले. कै. गोखले यांनी सुचवलेल्या सुधारणांचाच खर्डा जिनांनी या अधिवेशनात मांडला. त्यात आपट्यांच्या फार मोठा वाटा होता. या अधिवेशनानंतर काँग्रेसच्या लखनौ अधिवेशनाला ते गेले आणि यानंतर आपल्या मृत्यूपर्यंत लोकमान्य टिळकांना त्यांच्या राजकारणात त्यांनी पूर्ण पाठिंबा दिला.

१९१६ च्या ऑगस्टमध्ये त्यांच्या दोन कादंबऱ्या 'यशवंतराव खरे' आणि 'मी' प्रकाशित झाल्या. प्रथम 'मी' चा शेवट त्यांनी चार प्रकारांनी करून पाहिला होता. पण अखेर आजच्या उपलब्ध असणाऱ्या कादंबरीत जो शेवट आहे तोच त्यांनी पसंत केला. (दुसरा जो शेवट होता तो १९१९ साली मुंबईच्या मासिकात प्रसिध्द केला गेला.) 'यशवंतराव खरे' च्या प्रस्तावनेत

अपूर्ण राहिलेल्या 'आजच' आणि 'कर्मयोग' या दोन कादंबऱ्या पुरे करण्याचे त्यांनी आश्वासन दिले होते. त्यांच्या 'मी' त साधारण १८७५ साली त्यांच्या मनात ज्या मानसिक आकांक्षा होत्या (म्हणजे ती लिहिण्याच्या आधी पंचवीस वर्षे) त्यात व्यक्त झाल्या आहेत. आणि त्या विष्णुशास्त्री चिपळूणकरांचा प्रभाव आढळतो. १९१६ साली आपटे मुंबई विद्यापीठाच्या सिनेटचे सभासद म्हणून निवडून आले. सार्वजनिक जीवनातली सर्वोच्च आकांक्षा त्यांची पुरी झाली होती. यानंतर मात्र हळूहळू आपल्या कार्याचा व्याप ते कमी करू लागले. प्रथम ज्या 'करमणूक' मध्ये 'वज्राघात' ही त्यांची सर्वोत्कृष्ट ऐतिहासिक कादंबरी क्रमशः प्रसिध्द होत होती, ती पूर्ण होताच 'करमणुकी' चे प्रकाशन त्यांनी बंद केले. ते आता आपल्या ज्ञानयज्ञाच्या अखेरीस आले होते आणि १८९० पासून सुरू केलेल्या आपल्या महान लेखनाचे जणू शेवटचे प्रकरण लिहीत होते. जोशाच्यांसारखे त्यांचे मित्र त्यांच्या चांगल्या स्वभावाचा गैरफायदाही घेत होते. बंगालमधील तिस्क-करिग्राम-चिक्मारी रेल्वे फाट्याचे शेअर्स विकण्याची तयारी ही या त्यांच्या चांगुलपणाचाच भाग होती. श्री. जोशींच्यासाठी ते आपल्या मृत्यूपर्यंत या शेअर्सच्या विक्रीसाठी खटपट करीत हिंडत होते.

२७ एप्रिल १९१८ रोजी पुण्याच्या किर्लोस्कर थिएटरात एक सभा भरली आणि तीत दिल्ली येथील वॉर कॉन्फरसमध्ये लोकांना भाग घेऊ न देण्याच्या ब्रिटिश सरकारच्या धोरणासबंधी विचार करण्यात आला. एकीकडे याप्रमाणे सरकार लोकांची सहानुभूती घालवीत होते तर दुसरीकडून युध्दप्रयत्नांत त्यांची मदत मागत अपेक्षित होते. लोकमान्य टिळकांनी सभेचे अध्यक्ष म्हणून आपट्यांचे नाव सुचवले. आणि त्यांनी अपल्या भाषणात हिंदुस्थानला स्वंयनिर्णयाचा हक्क देण्याच्या सरकारच्या हेतूबद्दल शंका व्यक्त केली. बॅरिस्टर घासवाला आणि श्री. लिमये यांनीही या सभेत भाषणे केली. जरी श्रीनिवास शास्त्री, रॅंग्लर परांजपे यासारखी नेमस्त मंडळी टिळकांच्या विरोधात होती तरी लखनौ ॲक्टच्या ध्येयधोरणानुसार आपटे पूर्णपणे टिळकांच्या बाजूचे होते. शास्त्रींनी मॉंटेग्यू चेम्स्फर्ड सुधारणांचे स्वागत केले होते आणि आपले त्यासंबंधीचे समाधानही व्यक्त केले होते. आपट्यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात या सुधारणान्वये प्रांतातही स्वयंशासनाचा हक्क कसा दिला जात नाही हे स्पष्टपणे सांगितले. आश्चर्याची गोष्ट म्हणजे अध्यक्षांचे आभार मानण्यासाठी उभे राहिलेले रॅंग्लर परांजपे यांनी स्वतःच एक प्रदीर्घ भाषण करून सभेच्या प्रथेविरूध्द अध्यक्षीय भाषणांवर टीका केली. त्याच्या थोडे आधी ता. २२ मार्चला लोकमान्य टिळकांच्या लंडन सफरीबद्दल (जेथे टिळक स्वराज्याच्या मागणीसाठी जाणाऱ्या प्रतिनिधीचे म्होरके म्हणून जाणार होते) शुभेच्छा व्यक्त करण्यासाठी जी सभा भरली तिचे आपटे अध्यक्ष होते. सभेत बोलताना आपट्यांनी टिळकांचा साभिनंदन गौरव केला आणि आपली राजकीय

मते न्या. मू. रानड्यांच्या मार्गदर्शनाखाली कशी बनली आणि ती अद्यापही कशी टिकून आहेत हेही सांगितले. त्यांनी टिळकांना प्रवासात शुभ चिंतून ते जी स्वराज्याची मागणी करणार होते त्या मागणीच्या यशाबद्दल परमेश्वराची प्रार्थनाही केली. येथे लक्षात येईल की 'कर्मयोग' मधील भावानंदाच्या विरागी व्यक्तिरेखा कशी टिळक आणि त्यांची राजकीय मते व्यक्त करते. नगरपालिकेच्या पुढील अध्यक्षीय निवडणुकीत आपटे हरले. टिळकांचे पाठिराखे त्यांचा हेवा करू लागले; आणि नेमस्तही तितकेच त्यांचे विरोधी बनले.

ज्या श्री. जोशी यांच्या स्नेहापोटी त्यांनी तिस्क-करिमाम-चिक्मारी रेल्वेचे शेअर्सचे काम स्वीकारले होते, त्या कामासाठी ते १९१८ साली एक महिना कलकत्त्यात राहिले. जोश्यांनी नंतर ते सारे काम आपट्यांच्यावर टाकले. आपट्यांना आपला शब्द पाळण्यासाठी शेअर्स विकण्याकरता अनेक ठिकाणी फिरावे लागले. त्याच्या आधीच त्यांना डोळ्यांचा त्रास सुरू झाला होता आणि आपली दृष्टीच जाणार अशी भीती त्यांनी वाटू लागली. ही भीती दूर होते न होते तोच त्यांना मलेरियाने पछाडले. या जोडीला अपचनाचा जुनाट आजार त्यांना होताच.

कलकत्त्याहून ते दिल्लीला गेले आणि तेथून ते इंदूरच्या होळकर महाराजांना भेटण्यास इंदूरला गेले. इंदूरचे महाराज काही दिवसांनी इंदूरला यावयाचे असल्याने त्यांना भेटण्यासाठी त्यांना काही दिवस राहावे लागले. तेथे रोजच्या प्रमाणे सकाळचे फिरणे आटोपून परततांना एके दिवशी ते गारांच्या पावसाच्या तडाख्यात सापडले, आणि परिणामतः त्यांच्या पायावर आणि जठरावर सूज आली. डॉ. शारंगपाणी यांनी त्यांना जलोदराचा विकार झाल्याचे निदान केले आणि शक्य तो लवकर घर गाठण्याचा सल्ला दिला. नंतर ते होळकर महाराजांना भेटले आणि आपले काम यशस्वी करून त्यांनी इंदूर सोडले; पण परतांना खांडवा स्टेशनवर ते पुनः आजारी झाले आणि त्यांना तेथे रहावे लागले. त्यांनी नागपूरला आपल्या पत्नीला तार करून खांडव्याला सोबतीला बोलावले. भुसावळ स्टेशनवर तिला आपट्यांच्या ऐवजी दीक्षितांचा मुलगा भेटला आणि जेव्हा त्याने आपट्यांच्या रोगाबद्दल तिला सांगितले तेव्हा ती घाबरून गेली. आणि मग ती दोघं खांडव्याला गेली. तेथून आपटे आपल्या पत्नीसह मुंबईला आले. २८ जानेवारी रोजी पब्लिक सर्व्हिस कमिशनपुढे या सेवांचे भारतीयकरण करण्याबद्दल त्यांना साक्ष द्यावयाची होती. सर्वांचे सल्ले बाजूला सारून ते साक्ष देण्यासाठी गेले. दुपारी मुंबईचे प्रख्यात डॉ. श्री. भडकमकर यांच्याकडून त्यांच्या प्रकृतीची तपासणी केली गेली. डॉक्टरांनी त्यांना तातडीने पूर्ण विश्रांतीचा सल्ला दिला आणि सर्व हालचालीही बंद करावयाला सांगून पब्लिक कमिशनपुढे साक्षीसाठी समक्ष जाण्याऐवजी ती लेखी निवेदनाद्वारे पाठवावी असाही सल्ला दिला. डॉ. देशमुखही हजर होते. हृदरोगाचा झटका येण्याची त्यांना भीती वाटत होती. आणि जलोदर तर बरा होण्यापलीकडे गेला होता. दोन एक आठवड्यात आपट्यांना थोडा

आराम पडला आणि डॉक्टरांच्या उपायांनी त्यांची सूजही कमी झाली. या आजाराने त्यांना मुंबईत पाच आठवडे राहावे लागले. पुण्यातील त्यांचे नातेवाईकही तेथे त्यांना भेटावयास आले. त्यात श्री. जोशीही (रेल्वे शेअर्सच्या संबंधातले) आले ते फक्त काही किरकोळ कागदपत्रांवर तातडीने त्यांच्या सह्या घेण्यासाठी. आपटे काही नवी पुस्तके आणि नवी प्रकाशने वाचण्यात कसेबसे दिवस काढीत होते. त्यांचा परिणाम आपले दुःख आणि आपल्या वेदना विसरण्यात होई. ते शांत राहात आणि आजाराच्या व्यथावेदनात आपल्या मित्रांशी कोटीयुक्त बोलण्याचा प्रयत्न करीत. त्यांचे डॉक्टर मित्रही येत आणि सल्ला देत आणि मदतही करीत. १९ फेब्रुवारीला अशुभ दिवशी (त्या तारखेला श्री. गो. कृ. गोखले आणि त्यांची लेक वारली होती) त्यांच्या वेदना तीव्र आणि सहन होईनाशा झाल्या आणि जठरावरील सूजही वाढली. त्यांच्यावर डॉ. भालेकरांच्या दवाखान्यात उपचार केले. जठरातील आम्ल द्रवाचा साठा आटोक्यात आणण्यासाठी त्याचा निचरा करण्याची आवश्यकता वाटू लागली. थोडेफार ते सुधारले पण यकृताच्या बेशुध्दीत गेले. आणि त्यांची प्रकृती झपाट्याने घसरू लागली. त्यांना पुण्याला हालवण्याचा सल्ला डॉ. भडकमकरांनी दिला. आपल्या पतीच्या या असहाय परिस्थितीमुळे सौ. आपट्यांना झालेले दुःख वर्णनापलीकडचे आहे.

जणू संकटे एकेकटी येत नसतात हे सिध्द करण्यासाठी म्हणूनच की काय या त्यांच्या आजारातच त्यांचे मित्र प्रा. लिमये यांच्या मृत्यूची वार्ता त्यांना कळली. अखेरीस त्यांना पुण्याला परत जाण्यास तयार करण्यात डॉक्टरांना यश आले. एक डॉक्टर तर पुण्यापर्यंत त्यांच्या बरोबर होता. समजुतीच्या काही घोटाळ्यामुळे जी गाडी त्यांना घरी नेण्यासाठी स्टेशनावर यावयाची होती ती वेळेवर आली नाही आणि म्हणून त्यांना मेण्यातून घरी न्यावे लागले. उन्हाळ्याची गरमी आणि मेण्याचे हादरे यांनी त्यांच्या वेदना वाढल्या. घरी पोहोचेपर्यंत तीनदा त्यांना रक्ताच्या उलट्या झाल्या आणि ते पुनः गाढ बेशुध्दीत गेले. रक्ताने माखलेले त्यांचे कपडे पाहून त्यांच्या पत्नीला भोवळ आली. डॉ. रेळे यांनी उभयता पति-पत्नीवर उपचार केले. थोड्याच वेळात ते शुध्दीवर आले. त्यांनी आपले मृत्यूपत्र लिहवून घेतले आणि त्या खर्ड्यावर कशीबशी आपली सही केली. त्यांनी आपल्या पत्नीकडे पाहिले आणि मृत्यूपत्रात सर्व कुटुंबियाची जितकी चांगल्या प्रकारे व्यवस्था करता येईल तितकी चांगली व्यवस्था केल्याचे सांगितले. विम्याचा हप्ताही त्याच दिवशी भरावयाचे त्यांना आठवले आणि तो भरण्याची व्यवस्था करण्यास त्यांनी तिला सांगितले.

आता अखेरपर्यंत ते शांत होते आणि केवळ आपल्या पत्नीसाठीच इच्छाबळाने ते आणखी तीन तास जगले. १९१९ च्या मार्चमधील ३ तारखेस त्यांनी आपला देह ठेवला आणि त्यांचे प्राण त्यांच्या प्रिय कन्येला भेटण्यासाठी पंचत्वात विलीन झाले.

या रीतीने एक थोर साहित्यिक कारकीर्द संपली. आपट्यांच्या मृत्यूने पुण्यातील सर्व राजकीय पक्षांना आणि घटकांना दुःख झाले. लोकमान्य टिळकांच्या केसरीनेही त्यांच्यावर मृत्यूलेख लिहून त्यांचा वैयक्तिक गुणांची आणि त्यांच्या राजकीय , सामाजिक आणि वाङ्मयीन कार्याची प्रशंसा केली.

# त्यांचे वाङ्मयीन कर्तृत्व

आपटे हे मराठीतील पहिले श्रेष्ठ कादंबरीकार होते आणि त्यातही त्यांच्या सामाजिक कादंबऱ्यांचे स्थान त्यांच्या सर्व कादंबऱ्यात महत्त्वाचे आहे.

त्यांनी सात सामाजिक कादंबऱ्या लिहिल्या : १) मधली स्थिती, २) पण लक्षात कोण घेतो ? ३) यशवंतराव खरे ४) मी, ५) मायेचा बाजार, ६) भयंकर दिव्य, आणि ७) जग हे असे आहे. आणखी तीन कादंबऱ्या अपूर्ण आहेत त्या अशा ८) गणपतराव ९) आजच १०) कर्मयोग.

त्यांच्या सामाजिक कादंबऱ्या पुण्यातील साधारण पंन्नास वर्षाचा काळ चित्रित करतात. त्या मध्यम वर्गीयांच्या जीवनाचे वास्तव चित्र काढतात, इंग्रजांच्या प्रभावाने आपल्या समाजात निर्माण झालेले दोष दाखवतात आणि समाजाच्या प्रगतीचा उपाय सांगतात. आपला नाश करणाऱ्या सनातनी परंपरेचे प्रतिकूल परिणाम सांगतात. आणि ब्रिटिशांच्या वागणूकीचे आणि त्यांचे आदर्श यांच्या अविचारी नकलांच्यामुळे जे दुर्गुण आपल्यात शिरले त्यावर टीकाही करतात.

जेव्हा आपला समाज स्त्री-पुरुष असा मूलभूत फरक करू पाहतोय तेव्हा त्याचे जे फायदे होतात त्याचेही हितकारक चित्रण ते करतात. एका आदर्श समाजाचे दृश्य ते उत्तम प्रकारे रंगवितात. त्यांच्याजवळ सखोल सूक्ष्म दृष्टी होती. त्या जोडीलाच इंग्रजी, मराठी आणि संस्कृत ग्रंथाचे त्यांचे वाचन व्यापक होते, त्यामूळे ते आपल्या कथाकादंबऱ्यात एक नवीन व्यापक असा दृष्टिकोन जोरकसपणे व्यक्त करतात. इंग्रजांच्या अनुकरणाने मदिरापान आणि स्वैर वागणूक हे दोष आपल्यात शिरले. आपली सामाजिक अधोगती त्यांच्या 'मधली स्थिती' या कादंबरीचा गाभा ठरली. सरकारी आणि शैक्षणिक नव्या कल्पनांच्यामुळे जी मोठी जागृती झाली होती तिने 'गणपतराव' या कादंबरीला विषय दिला, तर 'पण लक्षात कोण घेतो' ही एकत्र कटुंबपद्धतीचे दोष आणि तिच्यातील अडचणी यावर आधारलेली आहे. स्त्रियांची दयनीय अवस्था, त्यांचे पूर्ण दास्य, त्यांच्या शिक्षणाची गरज, आणि व्यक्तिस्वातंत्र्याच्या

संबंधात होणारी त्यांची धार्मिक गळचेपी या ज्या प्रथा समाजात रूढ होत्या त्या दूर करणाऱ्या सुधारकांच्या प्रयत्नांवर त्यातून प्रकाश टाकला गेला. त्यांच्या दुसऱ्या दोन कादंबऱ्या 'यशवंतराव खरे' आणि 'आजच' या राजकीय आणि सामाजिक स्वातंत्र्याच्या लढ्यावर आधारलेल्या आहेत. 'मी' सुद्धा देशाच्या प्रगतीच्या प्रयत्नांची चित्रे रेखाटते आणि राजकारणातील आपले उद्दिष्ट स्पष्ट करते. स्त्रियांचे शिक्षण, त्यांच्या आकांक्षा, या आकांक्षा पूर्ण न झाल्याने येणारे वैफल्य, आणि बदलत्या परिस्थितीतील सामाजिक अपुरेपणा हा भयंकर दिव्य आणि मायेचा बाजार यांचा विषय आहे. या तीनही कादंबऱ्यात आपटे कथनात्मक आणि आत्मनिवेदनात्मक पद्धती वापरतात. अलौकिकता आणि योगायोग यांचा जो उपयोग याआधीच्या कादंबऱ्यात केला जात होता त्यापासून आपट्यांच्या वास्तववादी कादंबऱ्यानी वेगळी वाट धरली. आपट्यांच्या वास्तववादी कादंबऱ्यात आजच्या नव्या साहित्यात आढळणारी नीतिभ्रष्टता व विकृती, आढळत नाहीत. काही वेळा एका कादंबरीतील पात्रे दुसऱ्या कादंबरीत पुनः आढळतात. उदा. 'मधली स्थिती' मधील विष्णू आणि यमुना 'गणपतराव' आणि 'पण लक्षात कोण घेतो ?' यांत पुनः येतात. 'गणपतराव' मधील स्वतः गणपतराव पुनः आजच, कर्मयोग आणि 'भयंकर दिव्य' यात आढळतात. त्याचप्रमाणे नाना आणि त्याची पत्नी यशोदा 'पण लक्षात कोण घेतो' आणि 'कर्मयोग' यात पुनः दिसतात. स्वामी अद्वैतानंद आणि लिंली 'आजच ' आणि 'कर्मयोग ' या दोघीत आढळतात. ताईही 'भयंकर दिव्य' आणि कर्मयोग यात सापडते. या पात्रांच्या पुनर्योजनेने कादंबऱ्या एकमेकाशी जोडण्याची पद्धती इंग्रजी आणि फ्रेंच कादंबऱ्यावरून घेतलेली दिसते.

'पण लक्षात कोण घेतो ?' ही कादंबरी लिहिली आहे ती उघडपणे हिंदू विधवांची मानहानी आणि त्यांचा परंपरागत छळवाद ही व्यक्त करण्यासाठी. या दोषपूर्ण पद्धतीचे आपट्यांनी जवळून दर्शन घेतले होते आणि त्याचे चित्रणही अंतःकरणपूर्वक केले आहे. शंकरमामंजीचे चित्रण तर अशा काही परिणामकारक रीतीने केलेले आहे की तो एक क्रूर आणि कठोर असा दांभीकतेचा वाङमयीन नमूना झाला आहे. या कादंबरीने महाराष्ट्रात जो क्षोभ निर्माण केला आणि जी जनजागृती झाली तिची तुलना मिस् हॅरिअट स्टोव्हच्या 'अंकल टॉम्स कॅबिन' शीच होऊ शकेल. ही कादंबरी एकत्र कुटुंबतील दोषही दाखवते. हे दोष पूर्वीच्या राज्याकर्त्यांनी आणि ख्रिस्ती धर्मोपदेशकांनी नेमके पकडले आणि वेळी अवेळी ते हिंदू सामाजिक पद्धतीवर टीका करतांना भडकपणे वर्णिले. या पक्षपाती टीकेने एकत्र कटुंब पद्धतीतील फायदे मुद्दामहून दुर्लक्षिले गेले आणि जेव्हा एतद्देशीय विचारवंतानी आपल्या समाजिक आणि आर्थिक रचनेचा विचार केला तेव्हाच हे फायदे काही समजले गेले. ही कादंबरी फक्त गैरफायदेच रंगवते.'यशवंतराव खरे' त आपट्यांच्या काळच्या राजकीय कल्पना आढळतात.

स्वातंत्र्यसंपादनासाठी सामाजिक सुधारणा आणि राजकीय सुधारणा यांत कोणाला प्राधान्य द्यावे हा प्रश्न सुस्पष्टपणे येथे मांडलेला आहे. ब्रिटिश सरकारच्या शिकवणीमुळे सामाजिक सुधारणावाद्यांनी उत्साहाच्या भरात जरी सामाजिक सुधारणांना प्राधान्य देऊन राजकीय पुढाऱ्यांच्या प्रयत्नांना कमी लेखले तरी काळाने राजकीय सुधारणावाद्यांचेच शहाणपण सिद्ध केले आहे. आणि ही गोष्ट न्यां.मू.तेलंगांसारख्या नेमस्तांनीही जे प्रथम सामाजिक सुधारणांना अग्रक्रम देत होते-मान्य केली आहे. कादंबरीत रंगवलेले राजकारण वरवरचे दिसते कारण कोणत्याही राजकीय सुधारणा आधी पाहिजे असे तावातावाने म्हणणाऱ्यांनी सामाजिक सुधारणेला कमी लेखले नव्हते. या राजकीय पुढाऱ्यांनी स्त्रियांच्यासंबंधी अवमान दाखविलेला नव्हता, किंवा स्त्रियांच्या प्रश्नासंबंधी ते अनुदार नव्हते की अनुकूल नव्हते. यशवंतरावाचे चित्र म्हणजे विद्वान आणि देशाभिमानी चिपळूणकरांचे एक हास्यकारक व्यंगचित्र वाटते. आपट्यांच्यासारख्या श्रेष्ठ मराठी लेखकाने असा पातळ का होईना बुरखा घ्यावा याबद्दल वाईट वाटते. याचा अर्थ एवढाच की आधी सामाजिक सुधारणा व्हावी याबद्दल ते उत्साही होते.

'मी' कादंबरी अधिक चांगली कलाकृती आहे. देशाभिमानासाठी अनेक गोष्टींचा त्याग करण्याची जरूरी त्यांत प्रतिपादिली आहे. भाऊच्या व्यक्तिचित्रात (जो कादंबरीतच नंतर भावानंद झाला ) आध्यात्मिकता आणि आत्मत्याग या जोडगुणांचा संगम झाला आहे. सुंदरीवरील प्रगट प्रेमाचा तो त्याग करतो, असे दाखवले आहे. यातील विषयाच्या वैश्विकतेमुळे ही कादंबरी सतत ताजी रहाणार आहे. भाऊने संन्यासी म्हणून सर्व आयुष्यभर देशाची सेवा केली.

'जग हे असे आहे' ही कादंबरी केवळ मनोरंजन करणारी आहे. यात सावत्र मुलगा आणि त्याची बायको सावत्र आईला आणि तिच्या मुलांना कसे छळतात हे रंगविले आहे. कादंबरीच्या अखेरीस छळ करणाऱ्यात सुधारणा होऊन चांगले कसे अखेरीस वाईटावर मात करते हे दाखविले आहे. फअरब्रेन हा एक समजूतदार स्नेही गृहस्थ, छळ करणारा एक इंग्रजी अधिकारी, सिस्टर चॅरिटी नावाची मानवतावादी ख्रिस्ती मिशनरी बाई ही या कादंबरीतील दुय्यम पात्रे असून त्यांतून त्या काळच्या अनेक इंग्रज लोकांच्या चांगल्या कार्याचे चित्रण केलेले आढळते.

"भयंकर दिव्य" या कादंबरीत सनातनी बापाच्या मनाविरुद्ध आपली सुशिक्षित आणि सुवर्तनी मुलगी कमला हिचे पद्माकराशी लग्न लाऊन दिल्याबद्दल कमलाचे वडील बळवंतराव आणि तिची आई यांचा कसा छळ होतो हे रंगवले आहे. खलनायक राजारामाने गैरसमज करून दिल्यामुळे पद्माकर आपल्या पत्नीची शंका घेतो आणि त्यागही करतो. पण जेव्हा

राजारामाची खलवृत्ती कळते तेव्हा पति-पत्नींचा समेट हातो. आपट्यांना कदाचित असे दाखवावयाचे असेल की सुशिक्षित मुलीचे सुखी जीवन हे त्या काळच्या समाजाच्या वास्तवाशी सुसंगत नाही. दांपत्यातील परस्पर प्रेम आणि विश्वास हीच त्यांना सुखी वैवाहीक जीवन देऊ शकतात.

' मायाबाजार ' ही कादंबरी तिच्या उद्दिष्टाबद्दल अधिक अस्पष्ट आहे. वासना आणि बाहेरख्यालीपणा यामुळे नवरा आपल्या सुशिक्षित आणि पतिव्रता पत्नीला, पद्माला कसा वाईट वागवतो आणि तिचा प्रियकर वसंतराव आपल्या प्रेमासाठी जन्मभर अविवाहित राहून कसा झुरतो याचे त्यात मिश्रण केले आहे.

'आजच' ही अपुर्ण कादंबरी आहे. हिच्यात नव्या पात्राबरोबरच आधीच्या कादंबऱ्यांतील अनेक पात्रे आढळतात. कदाचित या आपल्या महान राष्ट्राच्या पिढीला आपल्या विधायक कल्पना सादर करावयाच्या असाव्या. म्हणून राजकीय प्रगतीचा विचार करणाऱ्या यशवंतरावांसारखे पात्र येथे दिसते. राजकीय सुधारणांच्यापेक्षा सामाजिक सुधारणांना अग्रक्रम द्यावा असे म्हणणारा गणपतरावही येथे भेटतो. देशाचा औद्योगिक विकास व्हायला पाहिजे म्हणणारा कृष्णाबापू, तसेच देशकारणासाठी निःस्वार्थीपणे वाहून घेणाऱ्या लोकांसाठी संन्यासपद्धतीची पुनः स्थापना करावी असे वाटणारा अद्वैतानंद हेही आढळतात. कदाचित ज्या भावानंदाने वरील चारही प्रकारच्या व्यक्तींचा रोष पत्करला आणि देशाच्या सर्वांगिण प्रगतीची इच्छा केली त्या भावानंदाच्या कल्पनेचे यश त्यांना दाखवावयाचे असेल. हे सारे अडथळे असूनही तो आपली वाटचाल करतोच.

'कर्मयोग' ही आपट्यांची अपूर्ण कादंबरी आणि त्यांच्या कादंबरी मालिकेतील अखेरची. यातील कथानक गणपतरावाचा मुलगा चंद्रशेखर आणि पुतणी लिली यांच्याभोवती गुंफलेले आहे. पाश्चात्य शिक्षणामुळे जो चंद्रशेखर नास्तिकता आणि राष्ट्रीयता यांकडे वळू पाहतो तो एका प्रगाढ विचारवंत तत्वज्ञ अशा अद्वैतानंदाच्या संगतीत येतो. जर सर्व कार्य यशस्वी व्हावयाचे असेल तर त्यामागे धार्मिक श्रद्धेची गरज असते असेही त्यांना दाखवावयाचे असेल म्हणूनही असेल तो भावानंदाच्या संस्थेच्या कल्पनांना वाहून घेतो. आपल्या समाजाच्या सुधारणेला वाहून घेण्याच्या लिलीच्या निश्चयाशी त्याची कृती समांतर दिसते. ती भौतिक सुखे आणि वैवाहिक जीवन यांचा त्याग करते. येथे सर्वंकष विचार दिसतो तो श्रद्धेच्या बळावर केलेला आत्मत्यागाचा.

व्यक्तिचित्रणाच्या सौंदर्याने आपट्यांची कला युक्त आहे. या सौंदर्याविना त्यांच्या कलेला उणेपणा आला असता. त्यांची व्यक्तिचित्रे बहूतेक प्रत्यक्ष जीवनावरून घेतलेली आहेत. त्यांच्या

कृतीही चांगल्याप्रकारे निवडलेल्या आहेत. त्याचा परिणाम सत्याभास आणि आकर्षकता यात झाला. डिकन्स आणि जेन ऑस्टिन या इंग्रजी कादंबरीकारांच्या अनुकरणाने त्यांच्या काही कादंबऱ्यात रहस्याचा उपयोग केलेला दिसतो. त्यामुळे तरुण वाचकांच्या मनात उत्सुकता आणि गोडी वाढीला लागतात. 'मायेचा बाजार' मधील टोळक्यांचा दुष्टपणा आणि 'भयंकर दिव्य' मधील राजारामाचे रहस्य यांनी वाचनीयता वाढली आहे. 'पण लक्षात कोण घेतो ?' 'मी' आणि 'यशवंतराव खरे', यांत पूर्वसूचनात्मक स्वप्नांचा (त्यांच्या खरेपणाबद्दल कदाचित त्यांचा विश्वास असावा )उपयोग केलेला आहे. कादंबरीतील थोडेफार रहस्य यांचा परिणाम संमिश्र घटना आणि वाचकांची उत्सुकता वाढवण्यात होतो. रहस्यांचा उपयोग केलेला असावा तरी कथानकाची रचना चतुराईने केलेली आहे. त्यांच्या कादंबऱ्यातील वास्तवता हे त्यांच्या कादंबऱ्यातील आणखी एक प्रमुख आकर्षण आणि आत्मचरित्रात्मक पद्धतीचा उपयोग हे दुसरे एक आकर्षण. त्यांच्या कादंबऱ्यातील वास्तवतेचा काही वाचकांवर एवढा परिणाम झाला की " पण लक्षात कोण घेतो ? " मधील आत्मकथा खुद्द यमूची तर नाही ना असा गंभीर संशय त्यांना आला. पात्रांची विविधता आश्चर्यकारक आहे आणि त्यातून आपट्यांचे सभोवतीच्या समाजाचे अवलोकन सूक्ष्म दिसते.

आपट्यांनी आपल्या कादंबऱ्या मासिकातून क्रमशः प्रसिद्ध केल्या. परिणामतः त्या अपरिहार्यपणे पाल्हाळल्या गेल्या. प्रत्येक काही प्रकरणांच्या अखेरीस आणलेला संकटप्रसंग त्यांच्या लेखनाच्या गुणवत्तेला काहीसा मारक ठरलेला आहे. असे होणे अपेक्षितच होते; कारण अशीच गोष्ट स्कॉट आणि डिकन्स यांच्याबाबतही झाली होती. लेखन आणि त्याचे प्रकाशन यांत जाणारा काळही काही चुका होण्याला कारण झाला. अर्थात अशा चुका थोड्या आहेत म्हणा. त्यांच्या कादंबऱ्यातील पाल्हाळामुळे त्यांना मान देणाऱ्यांची संख्या आज कमी झाली आहे. काही वेळा दोन किंवा तीन कादंबऱ्या क्रमशः प्रसिद्ध केल्यामुळे आणि त्या जोडीलाच अन्य कामेही चालू ठेवल्यामुळे काही आधीच्या कादंबऱ्यावरील पकड ढिली झाली आणि वाचकांची उत्सुकताही कमी झाली. अशा कादंबऱ्या अपूर्ण राहिल्या. काही वेळा वेगवेगळ्या कादंबऱ्यांचे कथानक सारखे राहिल्यामुळे संवादाचा आशयही तोच तोच राहिला. व्यक्तिचित्रणाचा विशाल पट अखेरच्या प्रकरणात कसाबसा गुडाळला गेला. आधुनिक वाचकाला हा गबाळेपणा वाटतो.

त्याच्या सामाजिक कादंबऱ्यातील लक्षात राहणारी नावे म्हणजे यशवंतराव, गणपतराव, भावानंद, आणि चंद्रशेखर. उदात्तत्ता, विद्वत्ता आणि देशप्रेम यांची ती मूर्तिमंत रुपे होत. गोविंदराव, शंकर मामंजी, राजाराम, आणि चिंतोपंत हे खलनायकही दुष्टपणाचे अर्क आहेत. स्त्रीव्यक्तिचित्रात लक्ष्मीबाई, यशोदाबाई आणि यमुनाताई, सुंदरी, पद्मा, कमला, द्वारकाताई

आणि लिली ही सतत वाचकांची मने आकर्षित करतात. लक्ष्मीबाई, यशोदाबाई आणि यमुना ही आपट्यांच्या दृष्टीने विवाहित स्त्रियांचे आदर्श दाखवतात. साठ वर्षांपूर्वीच्या घरातील कुटुंबजीवनात ज्या गुणांची आवश्यकता होती ते गुण त्यांच्यात व्यक्त होतात. त्या अत्यंत प्रेमळ, पतिव्रता, आणि गुणी आहेत तशाच विनयशीलतेच्या आदर्श आहेत. ताई, सुंदरी वा लिली ह्या आपट्यांच्या स्वप्नातील उद्याच्या स्त्रिया आहेत आणि आजतर त्या सत्यच वाटतात. विचाराचा आणी संस्कृतीचा एक आदर्श त्या व्यक्त करतात.

आपट्यांनी एके ठिकाणी म्हटले आहे की व्यक्तिगत अनुभवाबाहेरचे एकही पात्र त्यांनी रंगवलेले नाही. विनायकराव, गोविंदराव, डॉ.मुगळे, गोपाळराव, आणि अनंतराव ही प्रत्यक्षातल्या व्यक्तींची स्वभावचित्रे आहेत, हर्षविधान नाट्यगृह म्हणजे पुण्यातील विजयानंद नाटकगृह आणि 'शंखध्वनी' म्हणजे 'पुणे वैभव' हे साप्ताहिक.ही सर्व 'मधली स्थिती' मध्ये आढळतात. यमुना ही पूर्ण वास्तव होती आणि तिच्या सर्व व्यथावेदना ह्या साक्षात अनुभवातून रंगवलेल्या आहेत. गणपतराव हे अंशतः स्वतः लेखकच आहेत आणि भाऊही त्यांच्या शालेय जीवनांचे दर्शन देणारा आहे तर भावानंद त्यांच्या आदर्शातून निर्माण झाला आहे. यशवंतरावाचे शिक्षक श्रीधरपंत अंशतः विष्णूशास्त्री चिपळूणकरांचे चित्र आहे. आणि 'आजच' मधील यशवंतराव, लोकमान्य टिळकांचे व्यक्तिचित्र आहे. कृष्णराव हे नामजोशींच्यावरून घेतलेले आहेत. डेक्कन कॉलेजचे प्राचार्य बेन हे 'कर्मयोग' मध्ये अमर झाले आहेत. आणि फेअरब्रेन आणि पुलीस्तेक हे त्यावेळच्या इंग्रजी लोकांची सत्यचित्रे आहेत. सिस्टर चॅरिटी हीही सत्यजीवनातली आहे.

त्यांच्या कादंबऱ्या ह्या पूर्णतः वास्तव आहेत आणि त्यांच्या अवतीभोवती जो समाज होता तो त्याच्या गुणदोषांसह त्यांनी रंगविला आहे. काही व्यक्तिचित्रे आदर्श आहेत म्हणजे प्रेम कर्तव्य, सभ्यपणा, सौंदर्य आणि बुद्धिमत्ता यांचे जे आदर्श त्यांनी मनी बाळगले होते त्यांची ती चित्रे होत. ते प्रत्यक्षात उतरू शकणारे आदर्श आहेत केवळ कल्पनेतील नव्हेत. ती कुणाच्याही भावनेला न पटणारी नाहीत. येथे रंगवलेल्या आदर्शांनी महाराष्ट्राच्या सामाजिक उत्क्रांतीत आणि सामाजिक आणि नैतिक निकषांच्या उन्नतीत योग्य तो वाटा उचलला आहे. त्या काळी स्त्रियांच्या संबंधी पुरुषांच्या मनात जो सनातनीपणा होता, मनाचा संकुचितपणा होता, अज्ञान होते, संशय होता, आणि सहानुभूतीचा अभाव होता त्याची आज कल्पनाही करता येणार नाही.

त्यांच्या सामाजिक कादंबऱ्याचे सौंदर्य योग्य संवाद आणि सुंदर वर्णने यांत सामावले आहे. लहान वयातील मुले आणि मुली, त्यांचे तरुणपण, लग्नानंतरचे त्यांचे जीवन, आदर्श नायक आणि नायिका, पती आणि पत्नी यांची चित्रे अत्यंत आकर्षक आणि सत्य आहेत.

दुःखाचे त्यांनी केलेले चित्रण हृदयविदारक आहे. निसर्गाचे त्यांचे वर्णन म्हणजे उदा. नद्या, डोंगर, जंगल, झाडे, सकाळ आणि सायंकाळ ही अचूक आहेत आणि वर्डस्वर्थची आठवण करून देणारी आहेत. 'कर्मयोग' मधील वनेश्वरी किंवा 'आजच' मधील हिमाचल यांची वर्णने मनोवेधक आहेत. त्यांच्या कादंबऱ्या त्यांच्या समकालीन महाराष्ट्रातील रीतिरिवाज, अंधश्रद्धा, आणि धार्मिक श्रद्धा यांचे विरळा ज्ञान व्यक्त करतात. सामाजिक सुधारणेच्या त्यांनी केलेल्या सूचना या वास्तव आणि अचूक आहेत. विचाराबाबत ते एकांगी नव्हते. राजकारण आणी उद्योजकता यांतील सुधारणांवर त्यांनी भर दिला. लोकहितवादी, फुले आणि आगरकर यांनी ज्याप्रमाणे कठोर भाषेत सुधारणांची बाजू मांडली तसे करून आपट्यांनी जुन्या पिढीचे, शत्रुत्व पत्करले नाही. ज्या सुधारणांची त्यांनी इच्छा व्यक्त केली त्या त्यांच्या आणि त्यांच्या नंतरच्या काळात प्रत्यक्षात येणारच होत्या. त्यांच्या लेखनाच्या यशाचे गमक त्यातच आहे. १८८५ नंतरच्या मराठी कादंबरीचा ते मानदंड आणि त्यांना 'आधुनिक मराठी कादंबरीचा जनक' मानणे यथायोग्यच आहे. १९१३ साली वा.म.जोशी यांची 'रागिणी' प्रसिद्ध होईपर्यंत तेच या क्षेत्रातले अग्रणी होते. जरी दुसऱ्या महायुद्धानंतरच्या नववाङ्मयाच्या युगाने मराठी साहित्याच्या तंत्रावर मात केलेली असली तरी आजही त्यांच्या कादंबऱ्याची परिणामकारकता कमी झालेली नाही.

# ऐतिहासिक कादंबऱ्या

हरिभाऊंनी ऐतिहासिक कादंबरी अधिक आकर्षक करण्याआधी मराठी ऐतिहासिक कादंबरी अशी नव्हतीच. आपट्यांना त्या लिहितांना परंपरा आणि इतिहास यांचा आधार घेतला. ऐतिहासिक विषय आणि व्यक्ती याच्यावर कादंबरी लिहिणे तसे कठीणच. कारण त्यांची सत्यता थोडीफार का होईना अपक्षपातीपणाने सांगितलेली असते. आणि त्यामुळे आपल्यास हवे त्याप्रमाणे त्यांना रुप देणे वा त्या व्यक्तीचें रेखाटन करण्याचे स्वातंत्र्य त्याला घेता येत नाही. आणि म्हणून ऐतिहासिक वातावरण निर्माण करणे आणि प्रख्यात ऐतिहासिक व्यक्तींना कादंबरीत क्वचितच स्थान देणे हा मार्ग ऐतिहासिक कादंबरी लेखकाला स्वीकारावा लागतो. एका ऐतिहासिक वातावरणात ते स्वतःचीच व्यक्तिचित्रे निर्माण करतात. इतिहासाला काल्पनिकतेची जोड देणे हे ऐतिहासिक कादंबरीचे काम सामान्यपणे मानले जाते किंबहुना ऐतिहासिक कादंबरी ही संज्ञाच अर्थहीन ठरली कारण ती कल्पनानिर्मित असेल तर इतिहास नसेल आणि इतिहास असला तर कादंबरी असणार नाही. आणि म्हणून ऐतिहासिक वातावरणाचा तेवढा उपयोग करून काल्पनेला, वाव देण्याने आणि काल्पनिक व्यक्तिरेखा रंगवण्याने ही समस्या सोडवली जाते, या बाबतीत आपट्यांनी मोठे यश मिळवले. त्यांनी मध्ययुगीन भारतीय इतिहासातून रजपूत आणि मराठी विषय आपले निवडले.

चिपळूणकरांनी इतिहासविषयक नियतकालिके काढण्याची प्रेरणा दिल्यापासून आणि स्वतःही इतिहासावर लेखन केल्यापासून मराठ्यांच्या इतिहासाची मूळ कागदपत्रे प्रसिद्ध करण्याचे मोठे काम सुरू झालेले होते. १८८५ साली रायगड येथील शिवाजीच्या समाधीचा जिर्णोद्धार करण्याचे काम सरू झाले. न्या.मू.रानडे यांनी 'मराठ्यांच्या सत्तेचा उदय' हे पुस्तक लिहून ग्रँट डफने मराठ्यांचा इतिहास जो विकृत रूपात मांडला होता त्याला योग्य वळण दिले. टिळकांनी शिवाजीउत्सवाला सुरुवात केली. हे सारे वातावरण आपट्यांना ऐतिहासिक कादंबऱ्यांचे लेखन करण्यास प्रेरक झाले.

त्यांनी अकरा ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिल्या १) म्हैसूरचा वाघ १८९१,२) उषःकाल १८९७,३) केवळ स्वराज्यासाठी - १८९९,४) रुपनगरची राजकन्या १९०२ ,५) चंद्रगुप्त १९०२ ६) गड आला पण सिंह गेला १९०३ ,७) सर्वोदय १९०८,८) मध्यान्ह १९०८ ,९) सूर्यग्रहण १९०९ ,१०) कालकूट १९११ ,आणि ११) वज्राघात १९१५. पैकी ८,९ आणि १० या क्रमांकाच्या कादंबऱ्या अपूर्ण आहेत. या ऐतिहासिक कादंबऱ्यांचे विषय प्राचीन,मध्ययुगीन, शिवकालीन आणि पेशवेकालीन आहेत. ज्या विषयावर आपट्यांना लेखन करावयाचे असेल त्या विषयासंबंधी काळासंबंधी सर्व उपलब्ध मराठी आणि इंग्रजी पुस्तके वाचीत. 'चंद्रगुप्त' लिहिण्यासाठी त्यांनी पद्मपुराण आणि संस्कृत नाटक मृच्छकटिक वाचले; मध्ययुगीन शिवकालीन आणि पेशवेकालीन कादंबऱ्यासाठी फारशी तवारिखांचे इंग्रजी भाषांतर, आणि अन्य मराठी साधने वाचली. शेवटच्या कादंबरीसाठी त्यांना इंग्रजी इतिहासकारांनी लिहिलेली माहितीही सापडली. 'म्हैसूरचा वाघ' ही कादंबरी त्यांनी मेडोज टेबरच्या 'टिपू सुलतान' वरून लिहिली.

चंद्रगुप्तमध्ये स्वतः राजा कौटिल्य, मुरादेवी आणि पर्वतेश (म्हणजेच पौरस) ह्या साऱ्या व्यक्तिरेखा ऐतिहासिक व्यक्तिवरून रेखाटल्या आहेत. 'कालकूट' मधील पृथ्वीराज चव्हाण आणि जयचंद या प्रसिद्ध ऐतिहासिक व्यक्ती आहेत. 'उषःकाल' मध्ये इतिहासाचा गाभा अल्प असून प्रत्यक्षातल्या व्यक्तिरेखा शिवाजी, तान्हाजी, येसाजी, रामदास, दादाजी उर्फ दादोजी कोंडदेव, जिजाबाई, आणि मोरोपंत यांच्या व्यक्तिरेखा रंगवल्या आहेत. पण ऐतिहासिक वातावरण निर्मितीसाठी काल्पनिक घटनांचा अधिक उपयोग केलेला आहे. 'सूर्योदय' मध्ये अफजलखान, शिवाजी, नेताजी गोपीनाथपंत (राजदूत) या खऱ्या ऐतिहासिक व्यक्ति आहेत. प्रतापगडचे युद्ध आणि अफजलखानाचा वध ही सत्य इतिहासावर आधारलेली आहेत. 'सुर्यग्रहण' मध्ये जयसिंगाच्या विनंतीवरून आणि त्याने दिलेल्या खातरजमेवरून शिवाजीची आग्र्याला भेट आणि नंतर औरंगजेबाने केलेली कैद यांचे चित्रण आढळते. हा ऐतिहासिक भाग आहे. वज्राघात मध्ये तालिकोटची लढाई, विजयानगरच्या हिंदू साम्राज्याचा नाश वर्णिला आहे.

आपट्यांनी स्कॉटच्या ऐतिहासिक कादंबऱ्याप्रमाणे पुष्कळ परंपरागत तपशील वापरले पण त्यांना आपल्या काळच्या स्त्री-पुरुषांचे वेष चढवले. भुयारे, देवळे, गुप्तहेर, सरंजामी सरदार किल्ले, आणि विजापूर, आग्रा, रायगड, पूणे यांसारख्या राजधान्या यांचा उपयोग इतिहासाचे सत्य वातावरण निर्माण करण्यासाठी केला. परंतु कादंबऱ्यातील तरुण स्त्री-पुरुष बहूतेक काल्पनिकच आपट्यांच्या काळची राष्ट्रीय वृत्तीची तरूण पिढी दाखवितात. यातील बहुतेक कादंबऱ्यातील पहिले प्रकरण एखाद्या नाटकातील पहिल्या प्रवेशाप्रमाणे आकर्षक असते.

सूचनात्मक तपशिलाच्या योगे उत्सुकता निर्माण केली जाते आणि ती टिकवलीही जाते. अलौकिक मध्ययुगीन कल्पना (कोलेरिजच्या कवितेतल्या प्रमाणे ) प्रतिकात्मकता (सर्वोदयमधील वाद्याच्या झुंझीप्रमाणे ) सुडाच्या कल्पना,उपकथानके ( काही वेळी तीन तीन ), लहान सहान रहस्ये, उषःकालतल्या वा सर्वोदयातल्या प्रमाणे वेषांतर, ज्योतिषी, रजपुतांचे शौर्य उदा.रूपनगरची राजकन्या )फिरस्ते,गायक वा असंबद्ध भाषण करणारे,ग्रामीण बोलींचे मिश्रण,लष्करी तळ,आणि राजवाडे यांचा उपयोग आकर्षक,अलौकिक परिस्थितीने मध्ययुगीन वातावरण निर्मिण्यासाठी केला जातो. यापैकी बहुतेक कादंबऱ्या ऐतिहासिक सत्यता यत्- किंचितही कमी नाहित.(अपवाद कदाचित रूपनगरची राजकन्या ) या कादंबऱ्या क्रमशः प्रसिद्ध झाल्या आणि म्हणून त्यात विस्तार,नावांचे आणि व्यक्तींचे काही गोंधळ,सैल रचना,व्यक्तिरेखा आणि उपाय यांची पुनरुक्ती, आणि घटनांचा सारखेपणा ही उतरली आहेत. आपट्यांजवळ स्कॉचच्या प्रमाणे इतिहासाचा भविष्यकालीन दृष्टीचा अभाव होता आणि म्हणून ते आपल्या वाचकांत आदर्शवाद उतरवण्याचा प्रयत्न करीत. त्यांची भाषाशैली त्या काळाच्या नादस्वराशी मेळ घाली, आणि म्हणून ती सौंदर्याचा आदर्श ठरे.

आपट्यांनी आपल्या ऐतिहासिक कादंबऱ्यात साधारण शंभर ऐक स्त्री-पुरुषांच्या व्यक्तिरेखा रंगवल्या आहेत. त्यातील ६० तरी ऐतिहासिक आहेत. राक्षस आणि चंद्रगुप्त, रणमस्तखान आणि रामराजा, शिवाजी आणि आदिलशहा, औरंगझेब, अफजलखान, आणि उदयभानू; शिवाजी आणि औरंगझेब, संभाजी आणि राजाराम, जयचंद आणि पथ्वीराज, रघुनाथराव विरुद्ध दुसरा माधवराव, ही चांगले वाईटावर कसे मात करते याची उदाहरणे होत. श्रेष्ठ प्रकारचे चैतन्यशील आणि स्वार्थत्यागी स्त्री-पुरुष, चांगल्या कार्याला मदत करणारे श्रेष्ठ आणि ज्ञानी संत, धर्मतत्वावर विश्वास ठेवणारे दुराभिमानी, दडपशाही आणि तिचा प्रतिकार उठवळ आणि समर्पित लोक तसेच सर्वस्वार्पण करणारे लोक आणि विश्वासघातकी लोक - हे सर्व वाचकांची मते क्षुब्ध करतात. सावळ्याची व्यक्तिरेखा त्याच्यातील सत्यप्रियता, सचोटी, शौर्य, चलाखपणा,उत्तम स्मृती, आणि प्रसंगावधान यांच्यामुळे लक्षात राहण्यासारखी आहेत. आपटे सावळ्यावर इतके लुब्ध होते की त्यांना त्यांच्यावर एक स्वतंत्र कादंबरीच लिहावयाची होतो. पण ती लिहिली गेली नाही. या छोट्याशा रूपरेषेला त्यांच्या अनेक व्यक्तिरेखांची वर्णने करणे शक्य नाही. पण त्यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्यात राक्षस (चंद्रगुप्त) रणदुल्लाखान (उषःकाल) नयनपाल (रूपनगरची राजकन्या ) ताराबाई (सुर्योदय) रणदेवी (सूर्यग्रहण) किंवा किल्लेदाराची बायको (केवळ स्वराज्यासाठी ) अशा कितीतरी व्यक्ती लक्षात राहाणाऱ्या आहेत. ऐतिहासिक कादंबऱ्यात 'उषःकाल ', 'रूपनगरची राजकन्या ' , 'वज्रघात', आणि 'गड आला पण सिंह गेला' या कादंबऱ्या सुंदर आणि वाचकाचे मन वेधणाऱ्या आहेत.

जरी आपट्यांच्या सामाजिक कादंबऱ्या पुढील पिढ्यांना कमी आवडतील तरी ऐतिहासिक कादंबरीकार म्हणून मराठी वाङमयात ते नेहमी प्रसिद्ध राहतील.

त्यांनी कादंबऱ्याखेरीज अन्यही पुष्कळ लेखन केले. त्यांनी काही कविता लिहिल्या, भाषांतरित आणि स्वतंत्र नाटके लिहिली, निबंध लिहिले आज ज्यांना लघुकथा म्हणतात अशा गोष्टी लिहिल्या आणि लहान चरित्रेही लिहिली. त्यांनी अनेक व्याख्याने दिली. त्यातील कांहीतर पुस्तक रूपाने प्रसिद्धही झाली आहेत.

# कविता आणि नाटके

आपट्यांच्या कवितालेखनांकडे वळले तर प्रथम लक्षात येते ती 'शिष्यजन विलाप' नावाची शाळेत असतानाच त्यांनी लिहिलेली कविता ती त्याच्या पुढील लेखनाची अग्रदूत होती पण त्यांनी नियमितपणे आणि भरपूरपणे काव्यलेखन केले नाही. त्यांची बहुतेक कविता इंग्रजीतून भाषांतरिलेली आहे. उदा. 'लाँगेफेलोची साम ऑफ लाईफ' आणि शोलेची 'स्कायलार्क' संस्कृतमधूनही त्यांनी छोट्या छोट्या कविता भाषांतरिल्या. त्यांनी कृत्रिमपणे लिहिलेली प्रसिद्ध 'पोवाडा - गड आला पण सिंह गेला' शौर्य वीर्याच्या भावनेने भरलेला आहे. विषय आणि पद्धती यांच्याबाबतीत ते जुन्या पोवाड्यांची इतकी उत्तम नक्कल करीत की ते कुणाही जुन्या शाहीरांच्या नावे खपावेत. शातिमंगल या नावाची एक दीर्घ कविता , आपल्या प्रिय मुलीवर एक महाकाव्य लिहिण्याची त्यांची इच्छा होती; पण 'ज्ञानाचे अवतरण' या नावाची फक्त २२ कडवी त्यांच्याकडून लिहिली गेली. त्यांनी विनोदी कविताही पुष्कळ लिहिल्या पण आज त्या उपलब्ध नाही. टागोरांच्या 'गीतांजलीचे' त्यांनी गद्यात भाषांतर केले. भाषांतर म्हणून ते उत्तम उतरले आहे कारण, मुळातला आशय त्यात सुंदरपणे व्यक्त झाला आहे. पण ते गद्यात असल्याने मुळातले स्वरमाधुर्य त्यात आलेले नाही.

'संत सखु' आणि 'सती पिंगला' ही आपटे यांनी लिहिलेली दोन नाटके. 'संत सखूत' पंढपूरच्या विठ्ठलाची भक्त सखू आपल्या सासूकडून आणि नवरा दिगंबरपंत यांजकडून कशी छळली जाते याची कथा आहे. ती पंढरपूरला वारीला जायची ठरवते, पण परत घरी ओढून आणून तिला मारझोड केली जाते आणि तळघरात बांधून ठेवली जाते. विठ्ठल तिच्या रूपाने तिच्या घरी राहातो आणि तिला तिच्या ईप्सित वारीला जाऊ देतो. पंढरपुरला विठ्ठलाचे दर्शन घेते आणि त्याच्या पायावरच प्राण सोडते. तिची उत्तरक्रिया तिच्या खेड्यातील काही ब्राम्हणांच्याकडून केली जाते. विठ्ठलाची प्रेमळ पत्नी रुख्मिणी तिला जिवंत करून घरी पाठवते. ती घरी पोहोचताच ओळखली जाते पण भूत म्हणून हाकलून दिली जाते. तथापि

आकाशवाणीने सारे रहस्य उलगडले जाते. १ जाने. १९११ च्या 'करमणूक' मध्ये हे नाटक प्रसिद्ध झाले आहे. काहींच्या मते लोकमान्य टिळकांचा ब्रिटिश सरकारशी जो झगडा झाला त्याचे हे रूपक वा अन्योक्तिरूप आहे. अशीच अन्योक्तिरूपे शिररामपंत पराजपे आणि कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर यांनी केली आहेत. सासू ही ब्रिटिशसरकारचे प्रतिनिधरूप आहे. नवऱ्याची बहिण देशद्रोही दाखवणे आणि साखळदंडानी बांधून केलेली कैद ही तर उघडच आहे. सखूच्या दैवी मुक्ततेमुळे नाटकात मोठा मानसिक दुखःपरिहारक भाग येतो. प्रेक्षक प्रयोगाच्यावेळी नाटकाच्या अन्योक्तीत रंगत आणि टाळ्यांनी आपली पसंती व्यक्त करीत. नाटयकला प्रवर्तक मंडळीचे श्रेष्ठ नट सवाई गंधर्व, नरहरी परांजपे भजन करणाऱ्या आपल्या भजनी मंडळीसह आणि आपल्या मृदंगासह वासुदेवराव पटवर्धन, मास्तर कृष्ण गोपाळराव मराठे आणि अन्य लहानथोर मंडळी या नाटकांचा उत्तम प्रयोग करीत आणि नाटकगृहही गच्च भरे आणि उत्पन्नही उत्तम होई. हे नाटक दीर्घकाळ लक्षात राहील. या नाटकांची कथा महिपतीच्या संतविजयातून घेतलेली आहे. त्यांचे दुसरे नाटक 'सती पिंगला' हे श्रीधराच्या शिवलीलामृतावरून घेतले आहे. त्यात उज्जैनच्या कलकाचार्याची एक जैन कथा आणि प्रसिद्ध संस्कृत नाटक 'मृच्छकटिकम्' याचा काही भाग मिसळलेला दिसतो. मात्र हे नाटक यशस्वी झाले नाही.

आपट्यांची आणखी तीन नाटके आणि तीन फार्स लिहिले. 'जयध्वज' हे व्हिक्टर व्हुगोच्या 'हरमानी' वर आधारले आहे, तर 'श्रुतकिर्तिविचार' हे कॉंग्रिव्हच्या 'मॉर्निंग ब्राईडचे' रुपांतर आहे आणि तिसरे नाटक 'सुमतिविजय' हे शेक्सपिअरच्या 'मझेर फॉर मझेर' चे रुपांतर आहे. आणखी तीन विडंबननाटये म्हणजे धूर्तविलासात, मारून मुटकून वैद्यबुवा आणि 'जबरीचा विवाह' हे तीनही मोलिअरच्या फ्रेंच नाटकांवरून घेतलेले आहेत. या नाटकात अभारतीय वातावरण आहे. (एका पात्राचे नाव तर 'हेले असे' आहे.) आणि म्हणून ती लोकांना फारशी आवडली नाही.

आपट्यानी 'चाणाक्षपणाचा कळस' या नावाची लुच्चेपणावरील एक कादंबरीही लिहिली पण ती भाषांतरीत आहे. नोंद करण्यासारखे त्यांचे अन्य लेखन म्हणजे 'ऑटोबायॉग्राफी ऑफ शेक्सपिअर' (त्याच्या सुनीतावर आधारलेले ) वरील दोन लेख, आणखी दोन लेख म्हणजे एक 'रेमिनिसेन्सेस ऑफ मोहै' आणि दोन 'विदग्ध वाङमय' हे, 'कल्पित कथेचे तत्वज्ञान', 'कल्पित कथेतील वास्तवता भगवत गीतेची शिकवण', 'जॉन स्टुअर्ट मिल' (त्याच्या व्याख्यानातुन व्यक्त होणाऱ्या ) या विषयांवर त्यांनी व्याख्याने दिली. 'हास्य' आणि 'प्राचीन शस्त्रे' यांवरील त्यांची व्याख्यानेही लक्षात राहाण्याजोगे आहेत.

त्यांची मुंबई विद्यापीठातील विल्सन भाषाशास्त्रीय व्याख्याने काही उणिवांनी मुक्त आहेत. भाषाशास्त्रातील अनेक संबंधित समस्या त्यांनी वगळल्या आहेत.

त्यांनी शाळेतील मुलांच्या पुढे दिलेली आणखी तेरा लहान लहान व्याख्याने आहेत.

त्यांच्या लघुकथांची संख्या ३५ आहे. आधुनिक मराठी लघुकथेच्या त्या पूर्वसूचक आहेत. काही तर फारच मनोरंजक आहेत, पण त्यातील बोधवाद रसास्वादाच्या आड येतो.

त्यांनी लिहिलेली २० लघुचरित्रे भारतीय आणि पाश्चात्य वीरपुरुष आणि वीरांगना यांवर आहेत. त्यात त्यांची अभिरुचीची अभिजातता दिसते, आणि त्यांच्या स्वतःच्या चरित्र्यावरही प्रशंसनीय प्रकाश पाडतो.

त्यांची दोन प्रवासवर्णने आहेत. 'एक खंडाळा टेकडीचे सौंदर्य' आणि दोन 'लक्ष्मणझुला' दोन्ही वाचनीय आहेत.

येथे आपणं त्यांच्या वाङ्मयाच्या छोट्या विहंगमावलोकनाच्या अखेरीस येतो. हरी नारायण आपटे हे मराठीचे उत्तम लेखक होते आणि त्यांची खास शैली होती त्यांचे विचार आणि प्रामाणिक विचार त्यांच्या काळाच्या फार पुढे होते आणि त्यातून त्यांचे मानवी मन आणि प्रामाणिक विचार व्यक्त होतात. ज्यांना विरळ अशी वाङ्मयीन प्रतिभाशक्ति होतो आणि पुनः ज्यांनी देशाच्या सामाजिक आणि राजकीय जिवनात प्रत्यक्ष कार्य केले आहे अशापैकी ते एक होते. ज्या प्रामाणिकपणे त्यांनी लेखन केले त्यात त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची उंची दिसते. त्यांनी मराठी कादंबरीला एक नवे परिमाण दिले आणि मराठी वाङ्मयातील श्रेष्ठ गुणवत्तेचे लेखक म्हणून ते दिर्घकाळपर्यंत लक्षात राहतील. अनेक शतवार्षिक समारंभानंतरही त्यांचे वाङ्मय सुदैवाने उपलब्ध आहे. अर्थात त्याचे श्रेय महाराष्ट्र सरकारला द्यावयाला हवे. मराठी वाङ्मयाच्या वाचकांना विनयपूर्वक आम्ही त्यांच्या वाङ्मयाची शिफारस करतो. कारण त्यामुळे त्यांच्या दैवी बुद्धिमत्तेबद्दल आणि प्रतिभेबद्दल अधिक यथार्थ दर्शन होऊन वाचकांचा मोठा फायदा होईल.

